## शिक्षण-प्रसारक-मंडळी-पुणें

## कौशिक व्याख्यानमाला

[ वेदवाङ्मय ]

# निवेदन

आपल्या गोत्रपुरुषाच्या नांवानें शिक्षण-प्रसारक-मंडळीच्या एका अभिमानी सुपुत्रानें दहा सहस्रांचा निधि शि. प्र. मंडळीच्या स्वाधीन केला; आणि पुढे दिल्याप्रमाणे याविषयींची योजना शि. प्र. मंडळीचें नियामकमंडळ व सदर सज्जन यांच्या संमतीनें ठरली.

(अ) या निधीच्या वार्षिक उत्पन्नांतुन (१) 'ज्ञानदेव' किंवा (२) 'वेदसंस्कृति' या दोन विषयांपैकी एका विषयावर मंडळीच्या नियामकमंडळानें विख्यात विद्वानांना पाचारण करून प्रतिवर्षी एक व्याख्यानमाला गुंफावी.

(आ) कमींत कमी तीन अधिकांत अधिक पांच व्याख्यानें व्याख्यात्यानें द्यावीत.

(इ) व्याख्यानें मराठी किंवा इंग्रजी मार्फत द्यावयाचीं आहेत. तथापि त्यांचें लिखित मराठींतच देण्याविषयी नियामक मंडळ व्याख्यात्याला बंधन घालूं इच्छील तर त्यास तसें करितां येईल.

(उ) हीं व्याख्यानें लिहून काढून तें लिखित व्याख्यात्यास नि. मं. कडे द्यावें लागेल. निदान मागाहून तरी टिपणावरून व्याख्यानें लिहून नि. म. चे हवालीं करावीं लागतील.

(ऋ) या व्याख्यानांचें स्वामित्व शि. प्र. मं. च्या नियामकमंडळाचे अधीन राहील.

(ऌ) नियामकमंडळ ही व्याख्यानमाला यथाशक्य छापून प्रसिद्ध करील.

(ए) एखाद्या प्रकाशनाप्रीत्यर्थ कांहीं आर्थिक साहाय्य मिळाल्यास तें स्वीकारण्याचा नियामकमंडळाला अधिकार राहील.

(ओ) व्याख्यात्यांना नियामक मडळ यथासमर्थ व कांहीं 'संभावना-द्रव्य' देईल.

(अं) निधिदाते सज्जन आणि निधिधारक नियामकमडळ या उभयतांच्या संमतीने यांत योजनेंत फेरफदल होऊं शकेल.

(अः) या योजनेंतील प्रकाशनें **कौशिक -(ज्ञान॰ वेद॰) व्याख्यान॰ माला** या नांवाने प्रकाशित होतील.

स्थूलमानानें आज संमत केलेल्या आमच्या शि. प्र. मं. च्या कौशिक व्याख्यानमालेच्या योजनेचीं रूपरेसा याप्रमाणे आहे.

प्रथमवर्षी या मालेंत सुप्रसिद्ध अध्यात्मतत्त्ववेत्ते प्रा. रामभाऊ रानडे यांचीं व्याख्यानें झालीं. ज्ञानेश्वर व हिंदी संतकवि या विषयाचें त्यांनी विवेचन केलें. त्याचा सारांश प्रसिद्ध झाला आहे आणि त्यावरील त्यांचा ग्रंथ लवकरच प्रसिद्ध व्हावयाचा आहे. त्यानंतर डॉ. रा. ना. दांडेकर यांनी **"वैदिक देवतांचें अभिनवदर्शन"** या विषयावरील व्याख्यानमाला गुंफिली. डॉ. दांडेकरांच्या मागून प्रा. न. र. फाटक यांनी ज्ञानेश्वर-एकनाथ-रामदास या भक्तश्रेष्ठांच्या वाङ्मयाचें समालोचन करणारीं व्याख्यानें दिलीं. ज्ञानेश्वर व एकनाथ यांचेसंबंधी त्यांचे विवेचनपर ग्रंथ प्रसिद्धहि झाले होते आणि अगदीं अलीकडे रामदासांवरील ग्रंथहि प्रकाशित झाला आहे. पहिल्या व्याख्यानमालाप्रसंगीं अध्यक्षस्थान नामदार पतप्रधान श्री. बाळासाहेब खेर यांनी भूषविलें होतें. डॉ. दांडेकरांच्या वेळीं पुणें विद्यापीठाचे कुलगुरु नेक ना डॉ. मुकुंदराव जयकर आणि प्रा. फाटक यांच्या प्रसंगीं ना. राजेसाहेब नाईक निंबाळकर, मजूरमंत्री मुंबई सरकार, हे अनुक्रमें अध्यक्ष म्हणून लाभले होते हें नमूद करण्यास संतोष वाटतो.

आमच्या या कौशिक व्याख्यानमालेचें साक्षात् असें पहिलें प्रकाशन आज होत आहे हेंच म्हटलें पाहिजे. या व्याख्यानमालेंत प्रथित केलेला विषय यापूर्वी मराठी मार्फत कधीं प्रथित झालेला नाहीं म्हटलें तरी चालेल इतका तो अभिनव आहे.

सुमारें तीस वर्षांपूर्वी ज्ञानकोशकार कै. डॉ. केतकर यांनी ज्ञा को. च्या प्रस्तावनाखंडांपैकी दुसरा खंड 'वेदविद्या' हा प्रसिद्ध केला त्यांत वैदिक देवतेतिहासावर एक विस्तृत प्रकरण त्यांनी लिहिलेलें आहे. मराठी वाचकांस त्यांत पुष्कळ माहिती संकलित केलेली सापडेल. केतकरांचें विवेचन ज्याला दांडेकर निसर्गशक्तिवाद म्हणतात त्यावर आधारलेलें दिसतें. दांडेकर यांची उपपत्ति

'विकासवादी' दैवतशास्त्राची आहे. असें असलें तरी जिज्ञासु वाचकांस केतकरांनी संकलित केलेली माहिती वैदिक दैवतशास्त्राची पार्श्वभूमि समजण्यास पुष्कळच उपकारक वाटेल आणि दांडेकरांचें प्रतिपादन अधिक विवेचक रीतीने अवलोकन करण्यास उपयोगी पडेल.

केतकरांचें वर उल्लेखिलेलें प्रकरण वाचणारास हा वैदिक दैवतेतिहासशास्त्राचा विषय किती विस्तृत, किती जटिल आणि किती विवाद्य आहे हें सहज लक्ष्यांत येईल.

अशा अतिकठिण विषयाचें चारदोन व्याख्यानांत सुस्पष्ट विवेचन करून आपला दृष्टिकोण व्यवस्थितपणें समजावून देणें हें कांहीं सोपें काम खचित नाही. आमचे व्याख्याते डॉ. दांडेकर यांचा या विषयासंबंधीं अधिकार किती उच्च आहे हें हीं व्याख्यानें काळजीपूर्वक वाचणाऱ्या कोणाहि अभ्यासू वाचकास तेव्हांच समजून येणार आहे.

डॉ. दांडेकर यांनी जर्मनींत राहून शिक्षण घेतलें पण केवळ पाश्चिमात्य विद्वानांच्या मतांचें संकलन किंवा पुनरुच्चारण करीत न बसतां त्यांनीं आपली स्वतःची विवेचक दृष्टि चालवून आपलें मत म्हणून कांही बनविलें. आणि तें साधार व सोपपत्तिक रीत्या या व्याख्यानांतून त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. पण असें करतांना सर्व भिन्न मतप्रतिपादकांच्या व तज्ज्ञांच्या सिद्धान्तांचा, युक्तिवादांचा व प्रमाणांचा यथोचित परामर्शहि त्यांनी घेतला आहे. आम्ही या स्वतंत्र प्रज्ञेचें मनापासून कौतुक करतों.

डॉ. दांडेकर यांचीं हीं व्याख्यानें अतज्ज्ञांसहि समजतील इतक्या सरळ भाषेंत त्यांनी लिहून काढली आहेत. यायोगें मराठी भाषेंत एका उच्च विवेचक ग्रंथाची उत्कृष्ट भर त्यांनीं टाकली आहे. 'कौशिक व्याख्यानमाले'लाहि त्यामुळें साफल्य मिळाल्यानें हा ग्रंथ प्रकाशित करतांना आम्हांस समाधान वाटत आहे. आम्ही डॉ. दांडेकरांचे अत्यंत ऋणी आहोंत.

ज्येष्ठ शु. ११।१८७३
ज्ञानेश्वर-पालखी-
आगमन-दिन
ता. २७।६।५१

दत्तो वामन पोतदार,
अध्यक्ष
नियामकमंडळ
शिक्षण प्रसारक-मंडळी, पुणें.

# प्रास्ताविक

'कौशिक व्याख्यानमालें'तून मीं १९४८ च्या डिसेंबर महिन्यात पुढील चार व्याख्यानें दिलीं. पहिल्या व्याख्यानाच्या प्रसंगी पुणें विद्यापीठाचे माननीय कुलगुरु नेक नामदार डॉ. बाबासाहेब जयकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. ज्यावेळीं हीं व्याख्यानें देण्यात आलीं त्यावेळीच त्यांचें मुद्रणयोग्य हस्तलिखित तयार झालें होतें. परंतु, कांहीं कारणांमुळें, तीं आतापर्यंत छापून प्रसिद्ध होऊं शकलीं नाहींत.

व्याख्यानांच्या मूळच्या स्वरूपांत फारसा फरक न करतांच तीं आज प्रसिद्ध होत आहेत. फक्त कांहीं पदटीपा अधिक घातल्या आहेत. वैदिक दैवतशास्त्राचा अधिक खोल अभ्यास करणारास त्या पदटीपा उपयुक्त वाटतील असा माझा विश्वास आहे. या ग्रंथाच्या शेवटीं दिलेली सूचीहि अभ्यासकास उपयुक्त वाटेल अशी मला आशा आहे.

व्याख्यानें देतांना आणि आतां तीं प्रसिद्ध करतांना मला अनेक सुहृदांचें साहाय्य झालें आहे या गोष्टीचा मी कृतज्ञतापूर्वक उल्लेख करतों. त्यांतल्या त्यांत प्राचार्य दांडेकर यांच्या प्रेमळ साहाय्याचा मुद्दाम निर्देश करावासा वाटतो.

पुणें विद्यापीठ,
पुणें ७.
३० जून १९५१

रामचन्द्र नारायण दांडेकर

# अनुक्रमणिका

माझ्या मातापित्यांस

प्रेमादरपूर्वक अर्पण

# वैदिक देवतांचें अभिनवदर्शन

## व्याख्यान पहिलें

## " असुर " वरुण ( १ )

माननीय कुलगुरुमहोदय, हरिभक्तिपरायण प्राचार्य दांडेकर, आणि इतर विद्याप्रेमी सज्जनहो !

हीं दुसरी " कौशिक व्याख्यानमाला " गुंफण्याचा मान यंदा मला देण्यांत आला याबद्दल मी प्रथम या मालेच्या संचालकांचे मनःपूर्वक आभार मानतों. पुणें विद्यापीठाची कायदेशीर रीत्या स्थापना झाल्यानंतर हीं व्याख्यानें देण्याची संधि मला मिळत आहे हें तर मी आपलें विशेष सद्भाग्य समजतों. हल्लीं सर परशुरामभाऊ महाविद्यालयाच्या विद्यमानें चालविण्यांत येणारी ही व्याख्यानमाला लौकरच पुणें विद्यापीठाच्या विद्यमानें, त्या विद्यापीठाची ज्ञानप्रसार-व्याख्यानमाला म्हणून, चालविण्यांत येईल असा माझा समज आहे. तेव्हा या मालेंतील व्याख्यानांचा दर्जा एखाद्या सन्मान्य विद्यापीठास अनुरूप असाच राहील याची जबाबदारी, कांहींशा प्रमाणांत का होईना पण, यंदाच्या व्याख्यात्यावरहि पडते याची मला जाणीव आहे. पुणें विद्यापीठाच्या माननीय कुलगुरूंनीं माझ्या व्याख्यानमालेंतील या पहिल्या व्याख्यानाच्या प्रसंगीं अध्यक्षस्थान स्वीकारून माझा गौरव केला आहे ही गोष्ट तर खरीच ! पण त्याशिवाय, त्यांच्या आजच्या येथील उपस्थितीमुळे, वर उल्लेखिलेली जबाबदारीची जाणीव मला अधिक तीव्रतेनें होत आहे यांत संशय नाहीं. ती जाणीव मनांत बाळगूनच मी आपल्या विषयाचें प्रतिपादन करण्याचा निश्चपूर्वक प्रयत्न करीन येवढेंच मी आपणांस येथे सांगूं इच्छितों.

माझ्या व्याख्यानांचा विषय “ वैदिक देवतांचें अभिनवदर्शन ” असा आहे. विशेष प्रकारच्या आधुनिक शास्त्रीय दृष्टीनें आणि चिकित्सक पद्धतीनें वेदांचा अभ्यास करावयास प्रारंभ होऊन आज जवळ जवळ दीडशें वर्षें झालीं असें म्हणावयास हरकत नाहीं.[1] तेव्हापासून आजपर्यंत निरनिराळ्या पाश्चात्य आणि भारतीय विद्वानांनीं वेदविद्येच्या क्षेत्रांत जी बहुमोल कामगिरी केली आहे तिचा इतिहास कितीहि उद्बोधक आणि सर्व वेदाभ्यासकांस स्फूर्तिदायक वाटण्यासारखा असला तरी आजच्या प्रसंगीं त्याविषयीं बोलून आपल्या मुख्य विषयाच्या प्रतिपादनासाठीं नियुक्त केलेला कालावधि मी कमी करूं इच्छित नाहीं.[2] या सर्व पूर्व-सूरींचें फार मोठें ऋण माझ्यासारख्या वेदाभ्यासकांच्या शिरावर कायम-चेंच राहील या गोष्टीचा मान मी येथे कृतज्ञतापूर्वक निर्देश करतों. अगदीं स्थूलपणें असें म्हणतां येईल कीं आधुनिक वेदविद्येची गंगा-किंवा सिंधु म्हणा पाहिजे तर–एका बाजूला तौलनिक भाषाशास्त्र आणि दुसऱ्या बाजूला तौलनिक दैवतशास्त्र व सांस्कृतिक इतिहास या दोन हद-

---

(१) १८०५ सालीं कलकत्त्याच्या 'एशियाटिक रिव्ह्यू'मध्ये (वर्ष ८ वें), “ On the Vedas, or Sacred Writings of the Hindus ” हा लेख लिहून कोल्ब्रुकने वेदविद्येच्या या नवीन युगास प्रारंभ केला.

(२) आधुनिक वेदविद्येच्या सांगोपांग इतिहासासाठीं पुढें उल्लेखिलेलें लिखाण पाहावें : LUDWIG *Über die neueren Arbeiten auf dem Gebiete der RV–Forschung* (1893) OLDENBERG. *Vedaforschung* ( 1905). WINDISCH. *Geschichte der Sanskrit-Philologie und indischen Altertumskunde* ( 1917–1920). RENOU. *Les Maîtres de la Philologie Védique* (1928 ). RENOU. *Bibliographie Védique* ( 1931 ). DANDEKAR. “ Twenty-five Years of Vedic Studies ” ( in *Progress of Indic Studies* 1943 ) DANDEKAR. *Vedic Bibliography* ( 1946 )

बद्ध आणि सुप्रतिष्ठित अशा तटांमधून संथपणें वाहत आलेली आहे. आणि तिच्या प्रवाहाची विस्तृत तलभूमि मानवेतिहासशास्त्र ही आहे. या पवित्र प्रवाहांत—काठाकाठाशींच का होईना—अवगाहन करून कांहीं वैदिक देवतांचें जें अभिनवदर्शन मला झालेलें आहे तेंच आपणांस घडवून देण्याचा मी प्रयत्न करणार आहें. या व्याख्यानमालेंतून मी चार व्याख्यानें देणार आहें. पण विषयप्रतिपादनाच्या दृष्टीनें हीं चार व्याख्यानें प्रत्येकीं स्वतंत्र अशीं न राहतां एकमेकांशीं निकटपणें संबद्ध अशींच असतील हें येथे सांगणें मला अवश्य वाटतें. मुख्य विषयाच्या प्रतिपादनास प्रारंभ करण्यापूर्वीं मी आपली त्यासंबंधींची भूमिका अगदी थोटक्यांत आणि स्थूल स्वरूपांत प्रथम आपल्यापुढे मांडतों.

वैदिक देवतशास्त्र—हे शब्द मी Vedic Mythology या अर्थी सरसहा वापरणार आहें; आणि, तसेंच, जेव्हा जेव्हा मी 'वैदिक' असा शब्द वापरतों त्यावेळीं माझ्या मनांत विशेषतः ऋग्वेदसंहिताच अभिप्रेत असते हेंहि येथे स्पष्ट केलें पाहिजे–वैदिक देवतशास्त्र हें मुख्यतः इन्द्र-प्रधान देवतशास्त्र आहे हें सर्व वेदाभ्यासकांस सुपरिचितच आहे. इन्द्रदेवतेस उद्देशून लिहिलेल्या ऋग्वेदांतील सूक्तांच्या केवळ संख्याधिक्याकडे जरी दृष्टि टाकली तरीहि ही गोष्ट सहज ध्यानांत येण्यासारखी आहे.[३] आणि शिवाय वैदिक देवतशास्त्र इन्द्रप्रधान आहे ही घटना वेदकालीन सांस्कृतिक इतिहासाच्या विकासक्रमाशीं अगदी सुसंगत आहे हें मला पुढे दाखवावयाचेंच आहे. आता याविषयीं मुख्यतः दोन प्रश्न उद्भवतात. एक असा: वैदिक देवतशास्त्र हें प्रथमपासूनच इन्द्रप्रधान

---

(३) ऋग्वेदांतील एकूण १०२८ सूक्तांपैकी (यांत आठव्या मंडलांतील ११ वालखिल्यसूक्तें समाविष्ट आहेत) सुमारे २५० सूक्तें केवळ इन्द्रास उद्देशून लिहिलेली आहेत. म्हणजेच समग्र ऋक्संहितेचा सुमारे एक चतुर्थांश भाग इन्द्रात्मक आहे. याशिवाय इतर सूक्तांतून आलेले इन्द्राचे अनेक उल्लेख ध्यानांत घेतले तर ऋग्वेदांतील इन्द्रप्रधान भाग अधिकच मोठा आहेसें दिसून येईल.

असूं शकेल काय? आतापर्यंत अनेक विद्वानानी वैदिक संस्कृतीकडे—किंबहुना अखिल भारतीय संस्कृतीकडे—ती एक सर्वथैव स्वयंभू, अनन्याश्रयी, अन्यविच्छिन्न, isolated, अशी घटना आहे या दृष्टीनें पाहिलेलें आहे ही दृष्टि अगदीं प्रमादपूर्ण आहे हें सागावयास नकोच* सर्व सामान्य मानवी विचारविकासाच्या इतिहासाच्या पार्श्वभूमीवरच वैदिक दैवतशास्त्राचें विश्लेषणपूर्वक परीक्षण केलें पाहिजे, तरच तें योग्यफलदायी होईल, अन्यथा नाहीं मानवी विचारविकासक्रमाचा कस लावला तर असें दिसून येतें की इन्द्राधिष्ठित दैवतशास्त्रीय कल्पना ही वेदांतील सर्वांत जुनी कल्पना असूं शकणार नाहीं. इन्द्रप्रधान दैवतशास्त्र हीं वैदिक दैवतशास्त्राच्या विकासातील एक नतरची पायरी असली पाहिजे मग इन्द्रपूर्व दैवतशास्त्रीय प्रमुख कल्पना कोणती? ती कशी निर्माण झाली? तिचें पुढे काय झालें? इन्द्रकल्पनेचा उगम कसा झाला? या व एतत्सनद्ध इतर प्रश्नांचीं उत्तरें वैदिक वाङ्मयाच्या आधारे शोधणें हा माझ्या प्रतिपादनाचा एक भाग आहे इन्द्रप्रधान वैदिक दैवतशास्त्राविषयीं दुसरा प्रश्न उद्भवतो तो असा. वेदोत्तर हिंदु दैवतशास्त्रात इन्द्राचें वर्चस्व पुष्कळच कमी झालेलें दिसून येतें किंबहुना सामान्यपणें असें म्हणता येईल की वेदोत्तर पुराणवाङ्मयात वेदांतील प्रमुख देवता मागें पडल्या आणि वेदांतच दुय्यम — किंवा तिय्यम—दर्जाच्या समजल्या गेलेल्या देवता, जवळजवळ अचानक रीतीनें, प्रधान देवता म्हणून मानल्या गेल्या या घटनेचें कारण काय? तिचीं बीजें वेदांत सापडूं शकतात काय? तिचें काहीं ऐतिहासिक स्पष्टीकरण देता येईल काय? या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचा प्रयत्न करणें हा माझ्या विषय-प्रतिपादनाचा दुसरा भाग या प्रश्नांच्या अनुरोधानें वैदिक दैवतशास्त्राचें परिशीलन करण्यासाठीं मुख्यत तीन वैदिक देवतांच्या व्यक्तिमत्त्वाचा

---

(४) या विषयाचें प्रस्तुत लेखकानें केलेलें विवेचन *Proceedings of the Indian History Congress* 1947, pp 24–55, येथे पाहावें

चिकित्सापूर्ण दृष्टीनें अभ्यास करणें अवश्य आहे.[५] त्या तीन देवता म्हणजे "असुर" वरुण, "वृत्रहा" इन्द्र, आणि "शिपिविष्ट" विष्णु!

माझी भूमिका स्पष्ट करतांना आणखी एका गोष्टीचा उल्लेख मला केला पाहिजे. कोणत्याहि वैदिक देवतेचें व्यक्तिमत्त्व आपण तपासूं लागलों तर आपणांस असें आढळून येतें की त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वांत परस्परांशी असंबद्ध असलेले– आणि कांही बाबतींत तर परस्परांशी विरोधी असलेले– अनेक अंश आहेत. यामुळे वैदिक देवतांना एक प्रकारचें संमिश्र आणि संकुल असें स्वरूप प्राप्त झालें आहे. आणि याचा परिणाम म्हणजे वैदिक देवतांचें स्वरूपदर्शन करून घेतांना साहजिकपणेंच एक मोठी अडचण उत्पन्न झालेली आहे. या अडचणींतून बाहेर पडण्यासाठी वेदाभ्यासकांनी आतापर्यंत सामान्यतः दोन मार्गांचा अवलंब केलेला आहे. एक म्हणजे त्या अनेक अंशांपैकी कांही विशिष्ट अंशांवर भर देऊन केवळ त्यांच्याच आधारें त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वाचें चित्र रंगवावयाचें, आणि बाकीच्या अंशांकडे जवळ जवळ पूर्णपणें दुर्लक्षच करावयाचें. दुसरा मार्ग असा की वैदिक देवतांचें स्वरूप मूलतःच संमिश्र आणि संकुल स्वरूपाचें होतें असें मानावयाचें. या दोन मार्गांपैकी पहिला मार्ग अनुसरणाऱ्या पंडितांची संख्याच अधिक आहे. त्यांतहि वैदिक देवतांच्या स्वरूपांत निसर्गशक्तींच्या धर्मांचे जे कांही थोडेफार अंश दिसतात त्यांवरच बहुसंख्य विद्वानांनी भर दिलेला आहे; आणि निरनिराळ्या वैदिक देवता या मूलतः निरनिराळ्या निसर्गशक्तींच्या निदर्शक आहेत अशी उपपत्ति त्यांनी पुढे मांडली आहे. या उपपत्तीस वैदिक दैवतशास्त्रांतील निसर्गशक्तिवाद ( naturalistic interpretation of Vedic mythology ) असें नांव मी देऊं इच्छितों. हा निसर्गशक्तिवाद वैदिक दैवतशास्त्राचें सम्यग्ज्ञान करून देण्याच्या कामीं

(५) अशा अभ्यासाचा परिणाम त्या वैदिक देवतांचें अभिनवदर्शन घडण्यांतच होतो असें मला वाटतें.

पूर्णपणें असमर्थ आहे असें मला आग्रहानें पुढें मांडावयाचें आहे निरुक्तकार यास्कांनी आणि आधुनिक वेदाभ्यासकांच्या पहिल्या पिढीतील नामवंत विद्वानांनी या वादाचाच प्राधान्यानें पुरस्कार केलेला आहे. त्यामुळे त्या वादावर अधिष्ठित असलेल्या उपपत्तीस गौरव प्राप्त झाला आहे आणि त्याबरोबरच वैदिक देवतशास्त्राच्या सत्यदर्शनास एका दृष्टीनें एक मोठा अडथळाहि निर्माण झाला आहे वैदिक देवतांचें–विशेषत, या व्याख्यानमालेच्या द्वारा विचारांत घेतल्या जाणाऱ्या, वरुण, इन्द्र, आणि विष्णु या देवतांचें–मूलस्वरूप म्हणजे त्या देवता कोणत्या ना कोणत्या तरी निसर्गशक्तींच्या निदर्शक आहेत हा सिद्धान्त चुकीचा आहे हें मी पुढें दाखविणारच आहें वैदिक देवतशास्त्राचा अभ्यास करण्याची ही अगदी एकांगी दृष्टि आहे उलट पक्षीं वैदिक देवतांचें स्वरूप मुळापासूनच संमिश्र आणि संकुल होतें असें म्हणणें प्रत्ययदायी वाटत नाही हेंहि मला पुढें दाखवावयाचें आहे या मतानें एतद्विषयक प्रश्नाला केवळ बगल दिल्यासारखें मात्र होतें या बाबतींतील माझी भूमिका–जी मी आपल्या व्याख्यानांतून विस्तारानें पुढें मांडणारच आहें–अशी आहे वैदिक देवतशास्त्राचा ठोकळेबाज पद्धतीनें विचार करणें योग्य होणार नाही वैदिक देवतशास्त्र हें विकसनशील आहे, जीवंत आहे, गतिमान् आहे–केवळ स्थितिमान् नाही वेदकालीन सांस्कृतिक इतिहासांतील स्थित्यंतराबरोबर वैदिक देवतशास्त्रातहि अपरिहार्यपणें स्थित्यन्तर घडून आलीं असलीं पाहिजेत आणि या स्थित्यन्तराचा परिणाम म्हणजेच एखाद्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वांत दिसून येणारे परस्परासंबद्ध–किंवा परस्परविरोधी–अंश! त्या अंशांचें पौर्वापर्य सयुक्तिक रीतीनें निश्चित करणें, आणि त्यायोगें त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास कसा घडून आला असावा व का घडून आला असावा याचें शक्य तितक्या वस्तुनिष्ठ पद्धतीनें विवेचन करणें हें अत्यंत अवश्य आहे या दृष्टीनें वैदिक देवतांचा अभ्यास केला, त्यांच्या व्यक्तिमत्त्वात दिसून येणाऱ्या विसंगति आणि विरोध यांचें सयुक्तिक स्पष्टीकरण केलें, म्हणजे त्या देवतांचें आपणांस

एक अभिनवदर्शन घडतें असें मला वाटतें. एतद्विषयक माझ्या विचारपद्धतीस मीं "विकसनशील देवतशास्त्र"–Evolutionary Mythology– असें नांव दिलेलें आहे.

आतापर्यंत माझ्या विषयप्रतिपादनाची जी भूमिका मी आपल्यापुढे स्थूलरूपानें मांडली त्या भूमिकेवरूनच मी प्रथमतः वेदांतील वरुणदेवतेचा विचार करणार आहे.

ऋग्वेदांत प्रत्यक्ष वरुणदेवतेस उद्देशून लिहिलेल्या सूक्तांचा, तसेंच ऋक्संहितेंत व तदितर वैदिक वाङ्मयांत वरुणदेवतेसंबंधीं केल्या गेलेल्या मारवाच्या उल्लेखांचा, चिकित्सक व विधायक पद्धतीनें अभ्यास करून त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वासंबंधीं कोणती सुसंबद्ध व सर्वसमावेशक अशी कल्पना आपल्याला निर्माण करतां येते तें आपण प्रथम थोडक्यांत पाहूं.[*] ऋग्वेदांत वरुणाचा, वारंवार आणि अतिशय प्रामुख्यानें, 'असुर' या शब्दानें उल्लेख केला गेलेला आहे ( १·२४·७, २·२७·१०, ७·६५·२;

किंबहुना सृष्टीतील सर्व घटनांचें प्रवर्तन आणि नियमन त्याच्याकडून होत असतें. प्रत्यक्ष देवानाहि वरुणाच्या व्रताचें उल्लंघन करता येत नाहीं (८ ४१ ७), व त्याने प्रवर्तित केलेल्या ऋतास विरोध करता येत नाही. कारण देव स्वतःच त्या ऋताच्या चौकटींत बद्ध झाले आहेत ज्या शक्तीच्या प्रभावाने वरुणास विश्वाच्या सर्व लहानमोठ्या घटकांवर अधिराज्य चालविता येतें त्या शक्तीस वेदात 'माया' असें म्हटलें आहे या मायेच्या प्रभावानेच वरुण हा देवांचा आणि मानवांचा (२ २७ १०, १० १३२ ४)– सर्व जातमात्राचा, अखिल विश्वाचा (५ ८५ ३)– 'सम्राट' गणला गेला आहे (१ २५ १०) मानवाच्या किंवा सृष्टीच्या जीवनातील अगदी अल्पशी घटनाहि वरुणाच्या दृष्टीतून आणि नियमनातून सुटत नाही सूर्याचा उदय व अस्त, पर्जन्यवृष्टि, प्राणि व उद्भिज सृष्टीचा विकास, नद्यांचें विशिष्ट प्रवाहातून वाहणें, पक्ष्यांचें उडणें, एवढेंच काय, पण मनुष्याच्या डोळ्याची पापणी लवण–या सर्व घटनांचें प्रवर्तन आणि नियमन वरुणाच्या, सूक्ष्म रीतीनें अमलात येत असणाऱ्या, ऋतानेंच होत असतें 'विश्वावर अधिराज्य चालविणारा सम्राट' म्हणून वरुणाचें देवतासमूहातील स्थान सुप्रतिष्ठित झाल्यावर त्या स्थानास शोभणाऱ्या त्याच्या वैभवाचें वर्णन वैदिक कवींनी करावें हें क्रमप्राप्तच होतें आणि हें सर्व वर्णन एतद्विषयक पौरस्त्य परंपरेस धरूनच त्यांनी केलेलें आहे विश्वाच्या या अधिराजाच्या हुकमतीखाली अनेक हेर–स्पश–काम करीत असतात (१ २५ १३, ६ ६७ ५, ७ ६१ ३, ७ ८७ ३) आणि हे सुज्ञ, सर्वद्रष्टे, अदब्ध (म्हणजेच कधींहि न फसले जाणारे) दूत विश्वजीवनात वरुणाच्या ऋताचें उल्लंघन होत आहे असें वाटल्याबरोबर त्याची खबर तत्परतेनें आपल्या प्रभूकडे पोचवितात. या त्याच्या कार्यतत्परतेमुळेच ऋतोल्लंघनाचे प्रसंग विश्वात सहसा घडून येत नाहींत याच अर्थी, प्रत्यक्ष सूर्य हाच विश्वसम्राट् वरुणाचा चक्षु आहे असेंहि वैदिक कवींनी त्याचें उचित असें वर्णन केलेलें आहे (१ ११५ १, ६ ५१ १, ७ ६१ १) उच्चतम अशा स्थानीं, सहस्रस्तंभाविष्टित हिरण्मय आसनावर बसलेल्या

या सम्राटास विश्वातील लहानमोठ्या घटनांची माहिती देणें हे सर्वचक्षु सूर्याचें आणि इतर स्पशांचें कर्तव्य आहे ( ७ ६० १ ) यामुळेच वरुणास मानवाच्या सत्यानृताचा अदब्ध साक्षी होणे शक्य झालें आहे ( ७ ४९ ३ ) अथर्ववेदांतील एका सूक्तात ( ४ १६ ४–५ ) सांगितल्याप्रमाणे वरुण हा द्यौ आणि पृथिवी यामध्ये, तसेंच त्याच्यापलीकडे, असणाऱ्या सर्व वस्तुजाताचा प्रत्यक्ष साक्षी असून, दिगंताच्या पलीकडे जाऊनहि, कोणाला त्याच्या नजरेंतून सुटता येत नाही

हें प्रचंड विश्व म्हणजे व्यवस्थाशून्य आणि विस्कळित अशी वस्तु नाही वरुणाच्या पाशांनी बद्ध झाल्यामुळे या विश्वाला एक प्रकारचें सुसूत्र, सुनियमित आणि सुसंघटित असें स्वरूप प्राप्त झालें आहे हें विश्व अनियमनात्मक ( chaos ) नसून नियमनात्मक ( cosmos ) आहे–विघटनात्मक नसून संघटनात्मक आहे–याचे कारण म्हणजे वरुणाचे ऋतच ! सम्राट असुराच्या मायेचा हा प्रभाव !! वैदिक कवींनी वरुणाच्या पाशाचा, दुसऱ्या एका संदर्भातहि, उल्लेख केलेला आहे या वैश्विक ऋतास–आणि त्याचेंच मानवी स्वरूप असलेल्या नीतिनियमास–विरोध करणाऱ्या कुठल्याहि लहानमोठ्या दैवी किंवा मानवी शक्तीस, उचित प्रायश्चित्त म्हणून वरुणाच्या पाशांनीच बद्ध केलें जातें अशा रीतीने दुहेरी कार्य साधणारे वरुणाचे हे पाश म्हणजे त्या देवतेचें एक अनन्यसाधारण असें वैशिष्ट्य समजलें पाहिजे असुर वरुणाच्या एवंगुणविशिष्ट स्वरूपामुळे वैदिक सूक्तकार त्याचें भीतियुक्त आदरानेच आवाहन करतात व त्याच्याकडून स्वस्तियाचना करतात विश्वाची निर्मिति वरुणानेच केली आणि वैश्विक ऋताचे परिरक्षणहि तोच करतो. 'वैश्विक आणि मानवी जीवनांतील नीतीचा महान् नियन्ता' हेंच वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाचें सर्वांत प्रमुख वैशिष्ट्य समजलें पाहिजे 'असुर', 'मायिन्', 'धृतव्रत', 'ऋतवान्', 'साम्राज्य', 'स्पश', 'पाश'–हे ऋग्वेदांत वरुणाच्या संबंधात वारंवार उपयोजिलेले शब्द हीच गोष्ट स्पष्टपणें दर्शवितात

वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाचा दुसरा महत्त्वाचा विशेष म्हणजे मित्र आणि आदित्य यांच्याशीं असलेला त्याचा जवळजवळ अविभाज्य असा संबंध! 'मित्रावरुणौ' ही द्वन्द्वदेवता, मित्र व वरुण या देवतांचा वेगवेगळा पण साहचर्यनिष्ठ उल्लेख, आणि आदित्यांचा नेता म्हणून वरुणाचें स्थान या गोष्टी वेदवाङ्मयाच्या अभ्यासकांस सहज प्रतीत होण्यासारख्या आहेत. मला तर असें म्हणावयाचें आहे कीं वरुण, मित्र, आणि आदित्य यांचें एक स्वतंत्र व वैशिष्ट्यपूर्ण असें देवतामण्डलच वेदांत आहे, आणि त्या देवतामण्डलाकडे वैश्विक व मानवी जीवनांतील नीतिनियमांच्या परिरक्षणाचें कार्य सोंपवलें गेलें आहे. ऋग्वेदीय सूक्तांचा चिकित्सापूर्ण अभ्यास केल्यास असें दिसून येतें कीं इन्द्रदेवतेप्रमाणे या देवतामण्डलांतील देवतांनी कोणतेहि महान् वीरोचित पराक्रम गाजविलेले नाहीत. वैश्विक ऋताचें आणि मानवी नीतीचें रक्षण करणें हेंच या मण्डलाचें मुख्य काम! याच संदर्भांत जातां जातां हेंहि सांगावयास हरकत नाही कीं वेदांतील या देवतामण्डलाशीं स्वरूपदृष्ट्या व कार्यदृष्ट्या सदृश असें, अहुर मझ्द, मिथ्र, आणि अमॅश स्पॅत यांचें, देवतामण्डल प्राचीन इराण्यांच्या अवेस्तांतहि अस्तित्वांत आहे.

ऋग्वेदांत वरुणास अत्यंत महत्त्वाचें स्थान कां प्राप्त झालें आहे हें वर केलेल्या त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या वर्णनावरून सहज समजून येण्यासारखें आहे. वैदिक आर्यांच्या सांस्कृतिक जीवनाच्या विकासांत, दुसऱ्या कांहीं कारणांमुळे, इन्द्रासहि अत्यंत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. निरनिराळ्या देवतांस उद्देशून रचिलेल्या ऋग्वेदांतील सूक्तांच्या संख्येचाच केवळ विचार केला तर असें स्पष्ट दिसून येईल कीं इन्द्रसूक्तांची संख्या सर्वांत अधिक आहे. ऋग्वेदांतील सुमारें एक चतुर्थांश भाग त्या सूक्तांनी व्यापिला आहे वैश्विक ऋताचा आणि मानवी नीतिनियमांचा रक्षणकर्ता या नात्यानें वरुण मोठा, तर वृत्रादि विरोधकांचा निःपात करून वैदिक आर्यांचें जीवन सुरक्षित, सुखी, व समृद्ध करणारा म्हणून 'वृत्रहा' इन्द्र मोठा' यामुळे ऋग्वेदीय राष्ट्रजीवनांत वरुण आणि इन्द्र या दोन देवतांत सर्वश्रेष्ठतेसाठीं एक प्रकारची

त्तुरस असल्याचें दिसून येतें. मला पुढे असेंहि सुचवावयाचें आहे की वैदिकधर्मान्तर्गत वरुणधर्मानुयायी आणि इन्द्रधर्मानुयायी असे दोन पक्ष किंवा पंथ वैदिक कालांत अस्तित्वांत असले पाहिजेत. वरुण आणि इन्द्र यांच्यांतील विरोधाचे सूर अनेक ऋग्वेदीय सूक्तांतून आपणांस ऐकूं येतात. वरुणविषयक दैवतशास्त्राचा हा तिसरा महत्त्वाचा विशेष!

इन्द्र व इतर अनेक वैदिक देवता यांच्या तुलनेने वेदांत वरुणविषयक पुराणकथा–myths–फारशा आढळून येत नाहीत. तसेंच वैदिक कवींनी ज्या प्रमाणांत इतर वैदिक देवतांवर मानवी स्वरूपाचा आरोप केलेला आहे (म्हणजे ज्या प्रमाणांत त्या देवतांच्या बाबतींत anthropomorphism चा परिणाम झालेला दिसून येतो), त्या प्रमाणांत वरुणदेवतेवर मानवी स्वरूपाचा आरोप केलेला नाही. या गोष्टीहि वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाचें यथार्थदर्शन व मूल्यमापन करतांना लक्षांत घेतल्या पाहिजेत. ऋग्वेदांतील वरुणाचें व्यक्तिमत्त्व काहीशा गूढ पण भव्य अशा श्रेष्ठतेने भारावलेलें आहे. वरुणाची भीतियुक्त आदर निर्माण करणारी शक्ति व जवळजवळ दुष्प्राप्य अशी तेजस्विता, त्याचें अतिप्रखर तपःसामर्थ्य व अनाकलनीय दैवी ज्ञान यांच्यामुळे वैदिक कवींच्या मनांत सामान्यतः त्या देवतेसंबंधी भावंडेंचा मित्रत्वाची भावना निर्माण न होतां एक प्रकारच्या आत्मलयात्मक पूज्यभावच निर्माण झाल्यासारखा दिसतो इतर देवतांच्या स्वभाववर्णनांत व आचरणांत होणारा मानवी दुर्बलतेचा आविष्कार वरुणाच्या बाबतींत सहसा होत नाही.

ऋग्वेदांतील सूक्तांवरून वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाचें शब्दचित्रीकरण अगदीं मुक्त हस्ताने (free hand) व स्थूल रेषांनी मीं वर केलेलें आहे. पण वरुणाच्या प्रमुख विशेषांचा त्यांत उल्लेख येईल अशी दक्षताहि बाळगली आहे. या चित्रावरून वरुणाच्या व्यक्तिमत्त्वासंबंधी कोणत्या कल्पना आपणांस करतां येतात? वरुणाच्या व्यक्तिमत्त्वासंबंधी साहजिकच अनेक महत्त्वाचे प्रश्न उद्भवतात. त्या सर्व प्रश्नांचा विधायक

दृष्टीने विचार करुन कांहीं सिद्धांत पुढें मांडण्यापूर्वी त्याविषयीं पूर्व-सूरींनी जे कांहीं सिद्धांत पुढे मांडले आहेत त्यांचें चिकित्सापूर्वक विश्लेषण व परीक्षण करणें अत्यावश्यक आहे. अशा तऱ्हेची परीक्षा करण्याच्या चार महत्त्वाच्या कसोट्या आहेत असें माझें मत आहे. त्या अशा: पहिली कसोटी:— त्या सिद्धान्ताच्या अनुरोधाने आपणांस त्या वैदिक देवतेचें असें एक संपूर्ण चित्र निर्माण करतां आलें पाहिजे की जें त्या देवतेच्या वेदांत उल्लेखिलेल्या सर्व प्रमुख विशेषांशीं शक्य तितकें अनुरूप आणि सुसंबद्ध असें होईल. तसेंच त्या सिद्धान्ताच्या आधाराने, त्या देवतेच्या इतर देवतांशीं आणि कल्पनांशीं असलेल्या विशेष संबंधाचें समाधानकारक रीतीने स्पष्टीकरण करतां आलें पाहिजे. दुसरी कसोटी:— तो सिद्धांत सामान्यपणें अखिल मानवजातीच्या सांस्कृतिक इतिहासाच्या पार्श्वभूमीवर आधारलेला असावा. एकंदर मानवी विचाराच्या विकासमार्गाशीं तो जुळणारा असावा. त्या देवताविषयक कल्पनेचा उद्गम आणि विकास कसा झाला असावा हें ऐतिहासिक दृष्ट्या—तौलनिक दैवतशास्त्रदृष्ट्या—आपणांस स्पष्ट करता आलें पाहिजे. तिसरी कसोटी:—वेदोत्तर भारतीय वाङ्मयांतील व दैवतशास्त्रांतील त्या देवतेच्या स्वरूपाचें व स्थानाचें समाधानकारक स्पष्टीकरण त्या सिद्धान्ताच्या आधारें करतां यावें. आणि चवथी कसोटी:—तो सिद्धान्त भाषाशास्त्राच्या निकषावर तपासून घेता यावा

वरुणाचें व्यक्तिमत्त्व व त्याचे विशेष स्वभावधर्म यांविषयीं पूर्वसूरींनी जे सिद्धान्त पुढे मांडले आहेत त्यांपैकीं प्रमुख सिद्धान्तांची, वरील कसोट्या लावून, प्रथमतः परीक्षा करून, नंतर मीं आपल्या अभ्यासाच्या योगें त्याविषयीं जी एक उपपत्ति कल्पिली आहे ती साधक बाधक प्रमाणांसह आपणांपुढे मांडीन.

वरुणासंबंधीं सर्वसामान्य अशी कल्पना म्हणजे ती एक आकाश-देवता आहे ही होय. रोट, हामस्टेटर, हॉपकिन्स, बोनेन-बर्गर, श्राडेर आणि ब्लूमफील्ड या पाश्चात्य पंडितांनी याच

कल्पनेचा जोराने पुरस्कार केलेला आहे.[७] वैदिक दैवतशास्त्राचा प्रख्यात जर्मन अभ्यासक हिलेब्रांट यानेहि प्रथमतः याच कल्पनेस उचलून धरलें होतें. अर्थात् पुढे त्यानें आपलें मत बदललें ही गोष्ट वेगळी ! ही कल्पना मुख्यतः 'वरुण' या शब्दाच्या व्युत्पत्तीवर आधारलेली आहे. बहुतेक सर्व उपर्युल्लिखित विद्वान् 'वरुण' हा शब्द 'वृ' (म्हणजे 'झाकणें' किंवा 'समावेश करणें') या धातूपासून सिद्ध झाला आहे असें मानतात. प्राचीन लोकांच्या साध्या बालसदृश मनास असें वाटत असलें पाहिजे की आकाश हें पृथ्वीस व तीवरील सर्व वस्तुजातास प्रत्यक्ष झाकतें, त्यांचा आपल्यांत समावेश करतें. ही गोष्ट त्यांच्या इन्द्रियांस स्पष्टपणें प्रतीत होई. इन्द्रियांच्या द्वारा होणाऱ्या सर्व संस्कारांचा निःसंदेहपूर्वक स्वीकार करणें हा प्राचीन लोकांचा एक प्रमुख मनोधर्म होता. त्यांच्या मतें, आकाशाचा निळा घुमट हा खराखुरा, घन, आणि अविकारी असा घुमट असून तो सर्व वस्तुजातावर आवरण घालतो. हेंच वरुणाचें खरें स्वरूप! वरुण ही आकाशदेवताच आहे असें मानण्याचें दुसरें एक प्रबळ कारण या विद्वानांपुढे होतें. 'वरुण' हा शब्द भाषाशास्त्रदृष्ट्या ग्रीक *Ouranos*, 'यूरेनॉस' या शब्दाशीं सदृश आहे असें त्यांचें मत होतें. आणि ग्रीक 'यूरेनॉस' ही

---

(७) R. Roth. *PW* under Varuna; *ZDMG* 6. J. Darmesteter. "Le dieu suprême dans la mythologie indo-européenne" *RHR* I, 305; *Ormazd et Ahriman*, Paris 1877. E. J. Hopkins. *Rel. of India*, 70 ff.; *PAOS* XVI, cxlviii. K. Bohnenberger. *Der altindische Gott Varuna nach den Liedern des RV*, Tübingen 1893. L. von Schroeder. *Arische Religion* I, 322 ff: *WZKM* XI, 109–132, 225–253. M. Bloomfield *The Religion of the Veda*, 1908.

(८) A. Hillebrandt. *Vedische Mythologie* III, 4.

आकाशदेवता असल्याने वरुण हीहि आकाशदेवता असली पाहिजे असा सिद्धान्त त्यांनी पुढे मांडला.

पण वरुण म्हणजे आकाशदेवता असें मानण्याने एक अडचण निर्माण होत होती. वैदिक देवतामण्डलांत प्राचीन कालापासून अगोदरच एक आकाशदेवता होती. तिचें नांव द्यौः! तौलनिक भाषाशास्त्राच्या आणि दैवतशास्त्राच्या आधारें असें सहज दाखवितां येईल की द्यौः ही देवता सर्व यूरोभारतीय — Indo-European — धर्मांत फार प्राचीन कालापासून अस्तित्वात असली पाहिजे. असें असतांना दुसऱ्या आकाशदेवतेची आवश्यकता काय असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. वरुण ही आकाशदेवता आहे असें मत प्रतिपादन करणाऱ्या विद्वानांच्या पुढे ही शंका उपस्थित झाली नव्हती असें नाही. त्यांनी या शंकेचें निराकरण करण्याचाहि प्रयत्न केला आहे. श्राडरचें म्हणणें असें आहे की द्यौः आणि वरुण हीं एकाच आकाशदेवतेचीं दोन भिन्न स्वरूपे आहेत. द्यौः देवता ही दिवसा दिसणाऱ्या तेजस्वी आकाशाची द्योतक असून, वरुणदेवतेच्या कल्पनेंत आकाशाच्या सर्वव्यापी आणि सर्वसमावेशक स्वरूपावर मुख्यतः भर दिला गेला आहे. इंग्रजींतील firmament या शब्दानें वरुणाचा बोध होतो, तर sky या शब्दानें द्यौ देवतेचा बोध होतो. रात्रीच्या वेळीं आकाशाच्या तारकामय घुमटामुळे त्याच्या सर्वव्यापी आणि सर्वसमावेशक स्वरूपाची विशेषत्वाने प्रतीति होते, व त्यामुळेच ऋग्वेदीय मन्त्रांत वरुणाचा रात्रीशीं निकटचा संबंध आणला असल्याचें आढळून येतें. श्राडरनें पुढें असें प्रतिपादन केलेलें आहे की प्राचीन भारतीय व प्राचीन इराणी लोक हे एक सांस्कृतिक मानवसमूह या नात्यानें एकत्र वास्तव्य करीत असतां त्यांनी अखिल विश्वाची निर्मात्री म्हणून आकाशदेवतेची कल्पना प्रस्तुत केली. त्याच देवतेचीं भारतीय आणि इराणी धर्मांतून विकसित झालेलीं स्वरूपें, जीं अनुक्रमें वरुण आणि अहुर मज्द अशीं आहेत, त्यांचीं स्तुतिस्तोत्रें वैदिक आणि अवेस्ता वाङ्मयांत गायिलीं आहेत. त्यांतहि वैदिक वाङ्मयांत आढळणाऱ्या पुढील

रूचा पाहिल्या तर वेदांतील वरुणाची कल्पना मूळ आर्यांच्या (Indo-Iranian लोकांच्या) आकाशदेवतेच्या कल्पनेशीं अधिक जुळणारी आहे असें वाटू लागते :

स क्षपः परि षस्वजे न्युस्रो मायया दधे स विश्वं परि दर्शतः ।
तस्य वेनीरनु व्रतमुषस्तिस्रो अवर्धयन्नभन्तामन्यके समे ॥ (८.४१.३)
परि धामानि मर्मृशद्वरुणस्य पुरो गये विश्वे देवा अनु व्रतं नभन्तामन्यके समे ॥ (८.४१.७)
तिस्रो द्यावो निहिता अन्तरस्मिन्
तिस्रो भूमीरुपराः षड्विधानाः ।
गृत्सो राजा वरुणश्चक्र एतं
दिवि प्रेङ्खं हिरण्ययं शुभे कम् ॥ (७.८७.५).

याच्या उलट, झरथुष्ट्राच्या धर्मसुधारणेच्या चळवळीमुळे, प्राचीन इराणी धर्मातील अहुर मझ्दाच्या कल्पनेत मूळ आर्यांच्या कल्पनेचा अगदी निराळ्या रीतीने विकास झालेला दिसतो. अवेस्तात 'वरेन' हें एका पौराणिक स्थळाचें नाव असून त्याचें वर्णन 'चथ्रुगओष' असें केलेलें आहे. 'वरुण' आणि 'वरेन' या शब्दांचें भाषाशास्त्र-दृष्ट्या सादृश्य स्पष्ट आहे. अवेस्ताच्या काही विद्वान् अभ्यासकांच्या मतें 'चथ्रुगओष वरेन' हें चतुष्कोण आकाशाचेंच दुसरें नाव असावें. यावरूनहि वरुण म्हणजे आकाशदेवताच या समीकरणास पुष्टि मिळते असें वर उल्लेखिलेल्या विद्वानाचें म्हणणें आहे. ते पुढें असें म्हणतात कीं वेदांतहि वरुणाला 'चतुरनीक' असें संबोधिलेलें आहे; हीं गोष्ट या ठिकाणीं लक्षात घेण्यासारखी आहे. वरुणदेवतेच्या आकाश-

स्वरूपाला भाषाशास्त्राच्या आधारें आणखी एक पुरावा काहीं विद्वानांनी पुढे आणला आहे आमनियन या युगेभारतीय भाषेंतील *garuna* हा शब्द भाषिकदृष्टया 'वरुण' या शब्दाशीं सदृश असून त्याचा अर्थ आकाश असाच आहे असें त्यांचें म्हणणें आहे [९] वरुण म्हणजेच आकाश या कल्पनेचा उत्तरोत्तर विकास होऊन वरुण म्हणजे आकाशाभिमानी देवता — म्हणजेच ज्या नैसर्गिक घटनांचें अधिष्ठान आकाश आहे त्या सर्वांचा स्वामी, अधिराजा — अशी कल्पना सुप्रतिष्ठित झाली आणि याचीच परिणति वरुणास सर्व निसर्गाचें नियमन करणाऱ्या वैश्विक ऋताचा रक्षणकर्ता म्हणून मानण्यात झाली याच्या पुढची पायरी म्हणजे वैश्विक ऋताच्या रक्षणकर्त्यास मानवी नीतिनियमाचा नियन्ता मानणे ही होय आणि ती अगदी सहज आकलनीय अशी आहे [१०] पण ऋग्वेदातील उल्लेख पाहिले म्हणजेहि वरुणविषयक वरील सिद्धान्तास पुष्टि मिळते ऋग्वेदात सूर्याचें

---

(९) PETRABANT *Ethnol. Mitteilung aus Ungarn* V.

(१०) या बाबतीत काही विद्वानांना तर असेंहि प्रतिपादन केलें आहे की पुढे उद्धृत केलेले उद्गार काढतांना प्रसिद्ध जर्मन तत्त्ववेत्ता कांट याच्या मनात वरुणाच्या स्वभावविकासासंबंधी वर उल्लेखिलेली कल्पना कांहीं अशी अभिप्रेत असावी असें म्हटलें आहे Zwei Dinge erfüllen das Gemüt mit immer neuer und zunehmender Bewunderung, je öfter und anhaltender sich das Nachdenken damit beschäftigt Der bestirnte Himmel über mir und das moralische Gesetz in mir

(दोन गोष्टींचा जों जों अधिकाधिक विचार करावा जावें तों तों माझें मन नित्य नव्या आणि वर्धिष्णु अशा विस्मयादराच्या भावनेनें भरून जातें त्या दोन गोष्टी म्हणजे माझ्या मस्तकावरील तारकांकित आकाश आणि माझ्या हृदयांतील नीतिनियमविषयींची निष्ठा।)

वर्णन 'वरुणाचा चक्षु' असें केलेलें आहे (१·११५·१; ६.५१·१). आणि हें वर्णन आकाशस्वरूप वरुणास तंतोतंत लागू पडण्यासारखें आहे.

वरुण म्हणजे आकाशदेवता हा सिद्धान्त अनेक पंडितांनी मान्य केला असला तरी त्यांतहि अनेक पर्याय आहेत ही गोष्ट विसरून चालणार नाही. मॅक्स म्यूलरच्या मतें वरुण हा रात्रीच्या तारकांकित आकाशाचाच विशेषतः द्योतक आहे.[११] क्नाउवेर याने 'वरुण' या शब्दाचा 'वर्ण' या शब्दाशीं निकटचा संबंध आहे असें गृहीत धरून 'कृष्णता,' 'अन्धकार' हाच वरुणदेवतेचा विशेष गुण असला पाहिजे व म्हणून वरुण ही मूळ यूरोभारतीय कालांतील गव्याकाशदेवता असली पाहिजे असें आग्रहाने प्रतिपादिलें आहे.[१२]

रॉट, हॉपकिन्स, ब्लूमफील्ट इत्यादि पंडितांनी पुरस्कारिलेल्या आणि वरुण=यूरेनॉस या समीकरणावर मुख्यतः आधारलेल्या उपर्युक्त सिद्धांताची चिकित्सापूर्वक परीक्षा करणें जरूर आहे. अशी परीक्षा करूं लागतां प्रथमतःच एक गोष्ट आपल्या नजरेस येते ती अशी की हा सिद्धान्त मुळांतच प्रमादपूर्ण अशा व्युत्पत्तीवर आधारलेला आहे. 'आवरण करणें' या अर्थाच्या आणि 'यूरेनॉस' हा शब्द ज्या यूरोभारतीय धातूपासून सामान्यतः व्युत्पादिला जातो त्या धातूपासून सिद्ध झालेल्या सर्व उकारात्मक शब्दांत 'ऊ' दीर्घ असतो. संस्कृत–'वरूता,' 'वरूत्र,' 'वरूथ' आणि ग्रीक–*rūtor, rūter, erūto* वगैरे शब्द हीच गोष्ट दर्शवितात. 'वरुण' हा शब्द वर उल्लेखिलेल्या यूरोभारतीय धातूशीं संबद्ध असलेल्या 'वृ' या धातूपासून सिद्ध झाला आहे असें मानल्यास त्याचें रूप 'वरूण' असें व्हावयास पाहिजे होतें. तसेंच वैदिक 'वरुण' आणि ग्रीक

(११) MAX MÜLLER. *Contributions to the Science of Mythology* II.

(१२) F. KNAUER "Über Varuna's Ursprung." 14 *CO.* I, 1, 232.

'यूरेनॉस' या शब्दांचा भाषाशास्त्रदृष्ट्या संबंध असला पाहिजे हें मत स्वीकारण्याच्या बाबतींत उच्चारशास्त्रसंबद्ध अशा कांही अडचणी उपस्थित होतात असें मेये आणि ओल्डेनबेर्ग यांनी स्पष्टपणें म्हटलें आहे.[१३] मॅक्डोनेलनें आपल्या Vedic Mythology या विख्यात ग्रंथांत श्मिट या विद्वानाच्या मताचा उल्लेख केलेला आहे. श्मिट म्हणतो की 'वरुण' आणि 'यूरेनॉस' या शब्दांचा भाषाशास्त्रदृष्ट्या संबंध प्रस्थापित करणें ही गोष्ट सकृद्दर्शनीं दिसते तितकी सोपी नाही.[१४] वरुण म्हणजे आकाशदेवताच असें अट्टाहासानें प्रतिपादन करणाऱ्या श्राडरनेहि वरुण=यूरेनॉस या समीकरणाचा भाषाशास्त्रदृष्ट्या निःसंदेहपणें स्वीकार करतां येईलच असें नाही हें कबूल केलें आहे.[१५] या सर्व कारणांमुळे वरुण=यूरेनॉस हें समीकरण अलीकडे अगदी मागे पडल्यासारखें झालें होतें. परंतु अलीकडेच द्युमेझील या फ्रेंच पंडितानें वरुणाच्या यूरेनॉसशीं दिसून येणाऱ्या सादृश्यावर पुन्हा मोठा भर दिलेला आहे. अर्थात् त्यामुळे वरील सिद्धान्तास मुळींच पुष्टि मिळत नाही ही गोष्ट निराळी! द्युमेझील यानें 'वरुण' आणि 'यूरेनॉस' हे शब्द दोन भिन्न धातूंपासून साधलेले आहेत, आणि वरुणाच्या व्यक्तिमत्त्वासंबंधींहि अगदींच निराळी कल्पना पुढे मांडली आहे. 'विश्वदेवता' किंवा 'ऋतात्मक देवता', 'युद्धदेवता', आणि 'अर्थदेवता'—Moral divinities, Military divinities, Economic divinities — अशी आर्य देवतांची तीन वर्गांत विभागणी करून, द्युमेझील यानें वैदिक वरुण आणि ग्रीक यूरेनॉस या देवतांना पहिल्या

---

(१३) Meillet, *JA* 1907, II, 156 ff. Oldenberg—"Varuna und die Adityas" *ZDMG* 50, 60.

(१४) Macdonell *Vedic Mythology*, add and corr

(१५) *WZKM* IX, 118, 120.

वर्गातील अग्रस्थान दिलेलें आहे.[१६] वर उल्लेखिलेल्या आर्मेनियन *garuna* या शब्दाचाहि 'वरुण' या वैदिक शब्दाशीं भाषाशास्त्रदृष्ट्या कसलाच संबंध नाही असा ह्यूब्शमान या भाषाशास्त्रज्ञानें पूर्वीच हवाला दिलेला आहे. शिवाय, *garuna* या शब्दाचा मूळ अर्थ 'आकाश' असा नसून 'वसंतऋतु' असा आहे.[१७]

व्युत्पत्तिशास्त्रदृष्ट्या घेण्यांत येणाऱ्या आक्षेपाव्यतिरिक्त आणखीहि कांहीं आक्षेप या आकाशसिद्धान्ताविरुद्ध घेतां येण्यासारखे आहेत. वेदांत वरुणाचे म्हणून जे कांहीं विशेष स्वभावगुण व स्वरूपगुण सांगितले आहेत त्या सर्वांचा उलगडा या आकाशसिद्धान्ताच्या आधारावर समाधानकारक रीतीनें करतां येत नाही. या बाबतींत सर्वांत मोठी अडचण येते ती वरुणाच्या मित्र आणि आदित्य यांच्याशीं असलेल्या निकट संबंधाविषयी. १९०७ सालीं, ह्यूगो विन्क्लेर या जर्मन पुराणवस्तुशास्त्रज्ञास बोगझकाय येथील उत्खननांत सापडलेल्या मृण्मुद्रिकेवरील लेखांतहि वरुणाचा उल्लेख उ-रु-व-न-अश्-शि-एल् म्हणजे 'आपल्या समूहासह-अनुयायासह-वरुण' असा केलेला आहे. प्राचीन इराणी देव अहुर मझ्द याचें मित्र आणि अमेश स्पेंत यांच्याशीं नित्य निकटचें साहचर्य असल्याचें अवेस्तावरून स्पष्टपणें दिसून येतें. वैदिक दैवतशास्त्रांत वरुण, मित्र, आणि आदित्य यांचा एक विशिष्ट देवतासमूह असल्याचें जें निरनिराळ्या पुराव्यावरून सिद्ध होतें तें आकाशसिद्धान्ताशीं मुळींच जुळणारें नाही. मित्र हा मूलतः सूर्यदेवता आहे असें जरी कल्पिलें-ही कल्पना अगदी चुकीची आहे हें पुढे मला दाखवावयाचें आहे-तरीहि सूर्यस्वरूप

(१६) G. DUMÉZIL. *Ouranos-Varuna*, Paris 1934. दुमेझिल यांचे *Flamen-Brahman*; *Mythes et Dieux Germains*; *Mitra-Varuna*; *Jupiter, Mars, Quirinus* हे ग्रन्थहि या संदर्भात उल्लेखनीय आहेत.

(१७) पाहा : HILLEBRANDT. *VM* III, 5.

मित्र आणि आकाशस्वरूप वरुण याचाच विशिष्ट प्रकारचा सवं का असावा, हें ध्यानांत येत नाही तसेंच कांही वैदिक उल्लेखात मित्र आणि वरुण यांच्यामधील एका विशिष्ट प्रकारच्या विरोधावर भर दिलेला आहे[१८] तो कां हेंहि समजण्यासारखें नाही. शिवाय मित्रावरुणीं हिच्याशीं सदृश अशा द्यावासूर्यी अशा एखाद्या द्वन्द्वदेवतेची पुसटशी कल्पनाहि वेदांत इतरत्र आढळत नाही आकाशसिद्धान्ताचा पुरस्कार करणाऱ्या श्राडरने मित्र ही सूर्यदेवता आहे या कल्पनेचा पुढे त्याग केला ही गोष्ट जातां जातां येथे सांगण्यासारखी आहे.

इन्द्र आणि वरुण यांच्यातील विरोध हा वैदिक कवींचा एक आवडता विषय होता हें मागे सांगितलेंच आहे वरुण म्हणजे आकाश देवता या सिद्धान्ताने त्या विरोधाची अन्वर्थकता अगदी नाहींशी होते. वैदिक देवता या निसर्गातील वेगवेगळ्या शक्तींच्या प्रतिनिधिभूत अशा आहेत असा सिद्धान्त फार प्राचीन कालापासून पुढे मांडण्यात आलेला आहे. अर्थात् हा सिद्धान्त सर्वथैव स्वीकरणीय नाही हें मला पुढे दाखवावयाचें आहेच पण जरी वादासाठी तो सिद्धान्त कांही काळ मान्य केला आणि त्या सिद्धान्ताच्या अनुरोधाने इन्द्र म्हणजे सूर्यदेवता किंवा पर्जन्यदेवता असें समीकरण मान्य केलें तरी इन्द्र आणि आकाशस्वरूप वरुण यांचा विरोध कां असावा हें स्पष्ट होत नाही. आकाशसिद्धान्ताच्या पुष्ट्यर्थ

तिस्रो द्यावो॒ निहि॑ता अ॒न्तर॑स्मिन् । ( ७.८७.५ )

इत्यादि ज्या ऋचांचा पुरावा पुढे आणला जातो त्या ऋचा अगदीच सामान्य स्वरूपाच्या असून तशा तऱ्हेच्या ऋचा पर्जन्य ( ७.१०२.४ ) किंवा आदित्य ( अथर्व १३.२.३ ) या देवतांस अनुलक्षूनहि लिहिल्या गेल्या असल्याचें आढळून येतें याच्या उलट वरुणास उद्देशून लिहिलेल्या पुढील ऋचा पहा

( १८ ) मित्रो अहरजनयद् वरुणो रात्रिम्—तै. सं. ४.४.८.१

अव सिन्धुं वरुणो द्यौरिव स्याद्
द्रप्सो न श्वेतो मृगस्तुविष्मान्। (७.८७.६)
स समुद्रो अपीच्यस्तुरो द्यामिव रोहति नि यदासु यजुर्दधे ।
स माया अर्चिना पदाऽस्तृणान्नाकमारुहत्....( ८.४१.८ ).

या ऋचांतील 'द्यौरिव अव स्याद्', 'द्रप्सो न श्वेतः,' 'द्यामिव रोहति' 'नाकमारुहत्' हे शब्दसमूह वरुणाच्या आकाशस्वरूपाचे निदर्शक समजतां येतील काय? आकाशसिद्धान्ताचा स्वीकार केला तर वरुणाचा यमाशीं (१०.१४.७), मन्यूशीं (१०.८४.७.), पापाशीं (१.२४.९.), आणि धूर्ताशीं (१.१२८.७) जो विशिष्ट प्रकारचा संबंध वेदांत निर्देशिलेला आहे त्याचा अन्वयार्थ कसा लावतां येईल?

तौलनिक दैवतशास्त्राच्या दृष्टीने विचार केला तर असें आढळून येईल कीं कोणत्याहि आर्य लोकांनी—युरोभारतीय लोकांनी—आकाशदेवतेस ऋताचा व नीतीचा रक्षक व अध्यक्ष या उच्च पदवीस चढविलेलें नाही. द्यौःपितर—Jupiter—यास अनेक युरोभारतीय लोकांच्या पुराणांत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालेलें आहे यांत शंका नाही. पण त्याचें कार्यक्षेत्र मर्यादित स्वरूपाचें आहे. तसेंच वरुण आणि द्यौः या दोन आकाशदेवता वैदिक दैवतशास्त्रांत अस्तित्वांत होत्या असें गृहीत धरलें तर त्या दोहोंपैकीं वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाचाच ऋतप्रधान असा विकास कां झाला हें समजणें कठिण आहे. वरुण म्हणजे आकाशदेवता असें मानल्याने वरुणाचा माया, ऋत, पाश, इत्यादि कल्पनांशीं जो अविभाज्य संबंध आहे तो अर्थहीनच ठरेल! वेदोत्तर वाङ्मयांत वरुणविषयक कल्पनेचा ज्या प्रकारचा विकास झालेला दिसून येतो तसा विकास होण्याची शक्यताहि वरुण म्हणजे आकाश या सिद्धान्ताच्या स्वीकाराने फारशी प्राप्त होत नाही. थोडक्यांत म्हणजे वर ज्या चार कसोट्या सांगितल्या आहेत त्यांपैकीं एकाहि कसोटीस आकाशसिद्धान्त पूर्णपणें उतरत नाहीं असेंच म्हणावें लागतें.

हिलेब्रांटचें मत आहे. या बाबतींत यापेक्षाहि अधिक प्रत्ययदायी असा पुरावा नवव्या मण्डलांत आढळतो. त्या मंडलांत अनेक ठिकाणी वरुण आणि सोम यांचें सादृश्य निरनिराळ्या रीतीने दर्शविलें आहे.

तं मर्मृजानं महिषं न सानौ-
अंशुं दुहन्त्युक्षणं गिरिष्ठाम्।
तं वावशानं मतयः सचन्ते
त्रितो बिभर्ति वरुणं समुद्रे ॥ (९.९५.४)

तसेंच ( वरुणास उद्देशून )

त्री ष पवित्रा हृद्यन्तरा दधे। ( ९.७३.८ )

( सोमास उद्देशून )

सं त्री पवित्रा विततान्येषि....(९.९७.५५)

( वरुणास उद्देशून )

द्यावापृथिवी वरुणस्य धर्मणा विष्कभिते....(६.७०.१)

( सोमास उद्देशून )

नि यन्तरत्नम् गेद्ती। (९.१०१.१५).

तसेंच अग्निष्टोमयागारंभीं सोम म्हणजे वरुण असें समीकरण सुचविलें आहे. वरुणाच्या अधिराज्याप्रमाणेच सोमाच्या अधिराज्याचें वर्णनहि ऋग्वेदांत आणि इतर वैदिक वाङ्मयांत अनेकदा केलेलें आहे. वैदिक वाङ्मय आणि यागविधि यांच्या कर्त्यांच्या मनांत वरुण आणि सोम या दोघांमध्ये मुळींच दुजाभाव नसला पाहिजे असें हिलेब्रांटने पुष्कळशा पुराव्याच्या आधारें प्रतिपादिलें आहे. आणि सोम म्हणजे चन्द्र हा सिद्धान्त तर हिलेब्रांटच्या एतद्विषयक लिखाणाचें मूळ अधिष्ठानच आहे. अर्थात् वरुण म्हणजेहि चन्द्रच हें सहज प्राप्त होतं ओल्डेनबर्गप्रमाणे हिलेब्रांटहि मित्र म्हणजे सूर्य या समीकरणाचा स्वीकार करतो. परंतु वरुण आणि अहुर मझ्द यांचा अर्थाअर्थी कांहीहि

मित्राचा नित्य सहचर! मित्राचा वरुणाशीं इतका दृढ संबंध आहे की केवळ मित्रास उद्देशून रचिलेलें एकच सूक्त ऋग्वेदात आहे या सर्व पार्श्वभूमीवर ओल्डेनबेर्गने पुढील इमारत रचली आहे वैदिक देवता-मण्डलात परस्परांशीं संबद्ध असलेल्या सात देवतांचा—म्हणजेच आदित्यांचा—एक स्वतंत्र असा गट आहे, आणि या गटाच प्रामुख्याने आकाश आणि तेज यांच्याशीं जवळच नातं आहे या गटातील दोन देवताना—म्हणजेच मित्र आणि वरुण याना—विशेष महत्त्वाचें स्थान प्राप्त झालेलं आहे त्यांपैकी एक—म्हणजे मित्र—हा निःसंशय सूर्यस्वरूप आहे आणि दुसरा—म्हणजे वरुण—तेजःस्वरूप असून विशेषत्वाने रात्रीशीं संबद्ध—किंबहुना रात्रीचा स्वामी—आहे या दृष्टीने विचार केला तर वरुण म्हणजे चन्द्र हें समीकरण सहजच सुचतें व पटतें मित्र म्हणजे सूर्य आणि वरुण म्हणजे चन्द्र या अभ्युपगमाचा अतिदेश असा की आदित्य म्हणजे आकाशस्थ प्रमुख ग्रह[1] ओल्डेनबेर्गच्या सिद्धान्ताचा हा एक भाग झाला त्याच्या सिद्धान्ताचा दुसरा भाग असा सूर्य, चन्द्र, आणि इतर ग्रह या देवतांचा जो एक सुसघटित गट वेद आणि अवेस्ता वाङ्मयात दिसून येतो तो इतर कुठल्याहि यूरोभारतीय दैवतशास्त्रात आढळत नाही आर्यांच्या दैवतशास्त्रातील या विशिष्ट कल्पनेचा उगम कसा आला असेल याविषयी दोन अनुमानं करता येतील एक असं की आर्यांनीच इतर यूरोभारतीय लोकांच्या निरपेक्ष हा देवतासमूह निर्माण केला, किंवा त्यांनी या देवता एखाद्या परकीय दैवतशास्त्रातून घेतल्या आणि आत्मसात् केल्या ओल्डेनबर्गचें या बाबतीत असं मत आहे की आदित्यांचें हें अद्वितीय देवतामण्डल—ज्यात वरुण आणि मित्र हे प्रमुख आहेत—वैदिक आर्यांची राष्ट्रीय युद्धदेवता जो इन्द्र त्याचें वर्चस्व असलेल्या सर्वसाधारण देवतामण्डलाहून अगदी भिन्न स्वरूपाचें आहे वैदिक दैवतशास्त्रातील इन्द्र—वृत्र—कल्पना ही आर्यांची स्वतःची अशी कल्पना आहे याच्या उलट, वरुण—मित्र—आदित्य—

संबंध नाहीं असें त्याचें म्हणणें आहे. 'वरुण' या शब्दाचें कोणतेंच भाषिक रूप अवेस्तांत आढळत नाहीं. वरुण आणि अहुर मझ्द हे परस्परसदृश असते तर वैदिक वरुणाप्रमाणें अहुर मझ्दाचेंहि चन्द्रस्वरूप अवेस्तांत दिसलें असतें, पण तें तर तसें दूरान्वयानेंहि दिसत नाहीं. आपल्या सिद्धान्ताच्या पुष्ट्यर्थ सूत्रवाङ्मयांतील एका उल्लेखावर हिलेब्रांटने विशेष भर दिलेला आहे. 'डोक्यावर टक्कल पडलेला, पिवळ्या डोळ्यांचा, आणि पांढऱ्या फटफटित वर्णाचा पुरुष पाण्यांत उभा राहतो आणि आपल्या मस्तकावर हवींचा स्वीकार करतो', असें तेथें वरुणाचें वर्णन केलेलें आहे.[२१] हिलेब्रांट विचारतो : चन्द्राचें यापेक्षा अधिक चित्रमय—अधिक picturesque असें—शब्दचित्र काढतां येईल काय ? वरुणाच्या रात्रीशीं असलेल्या संबंधावरहि हिलेब्रांटने भर दिलेलाच आहे. पाण्याशीं आणि हिमऋतूशीं निकटचा संबंध हें वरुणाचें आणखी एक प्रमुख वैशिष्ट्य आहे ( ऐ. ब्रा. ८.२८.५ ). रात्रि, जल, आणि हिमऋतु यांचे विशेष स्वभावधर्म जर कुठें एकत्र सांपडत असतील तर ते चन्द्राच्या ठिकाणींच ! इथवर ठीक आहे !! पण चन्द्रास अखिल विश्वाचा अधिराजा—सम्राट्—बनविण्याची कल्पना पुष्कळांना पटण्यासारखी नाहीं. अशा प्रकारचा आक्षेप आपल्या सिद्धान्ताविरुद्ध निघेल हें ओल्डेनबेर्ग व हिलेब्रांट यांनी अगोदरच ओळखलें होतें; आणि म्हणून त्याचें निराकरण करण्याचाहि त्यांनी अगोदरच प्रयत्न केलेला आहे. अनेक प्राचीन लोकांच्या धर्मकल्पनेंत चन्द्रास अतीव सामर्थ्यवान् देवाधिदेव मानलें आहे हें लोमेल यानें आपल्या Die alten Arier ( प्राचीन आर्य ) या ग्रंथांत स्पष्टपणें दाखविलें आहे.[२२] मानवाच्या वैचारिक विकासांतील ही एक निश्चित अशी अवस्था आहे. ओल्डेनबेर्गने या बाबतींत अमेरिकेंतील आदि-

---

( २१ ) आप. २०.२२.६; शांश्रौसू. १६.१८.१८; वैमा. ३.५.३.१०; शतत्र. १३.३.६.५; वैमा. १.२.३.

( २२ ) H LOMMEL *Die alten Arier*. Frankfurt 1935.

वासींच्या धर्माचा, तसेंच फिनिश लोकांच्या धर्माचा, हवाला दिला आहे. ऊरचो चन्द्रदेवता नन्नार हिला उद्देशून सेमिटिक कवींनी रचिलेलें सूक्त[२३] वसिष्ठ ऋषींनी रचिलेल्या वरुणसूक्ताची आठवण करून देतें असेंहि ओल्डेनबेर्गने म्हटलें आहे.

या चन्द्रसिद्धान्ताचा प्रवर्तक ओल्डेनबेर्ग, आणि त्यास आपापल्या विशिष्ट परीनें अनुसरणारे हिलेब्रांट, हार्डी[२४] इत्यादि पंडित यांच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाचा पाठिंबा या सिद्धान्तास असल्यामुळे त्याचा अधिक खोलवर विचार करणें अवश्य आहे. प्रथमतःच एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे आणि ती ही की ओल्डेनबेर्ग यानें वैदिक वाङ्मयांतील पुरावा लक्षांत घेऊन त्यावर आपला सिद्धान्त आधारलेला नाहीं. प्रथम एक सिद्धान्त मांडून त्याला साधक असा पुरावा मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केलेला दिसून येतो. ओल्डेनबेर्ग आणि हिलेब्रांट यांच्या सिद्धान्ताचा आरंभ बहुंशीं मित्र म्हणजे सूर्य या समीकरणापासून झालेला आहे. त्यांचा हा आरंभबिन्दुच प्रमादपूर्ण आहे असें मला म्हणावयाचें आहे. अर्थात् या ठिकाणीं मित्र या देवतेचा चिकित्सापूर्ण व खोल असा अभ्यास करणें क्रमप्राप्तच होतें.

केवळ मित्रास उद्देशून रचिलेलें एकच सूक्त ऋग्वेदांत आहे, आणि तें म्हणजे तिसऱ्या मंडलांतील एकोणसाठावें सूक्त! भौतिक दृष्ट्या मित्रदेवतेस कांहीं विशिष्ट व्यक्तित्व होतें असें वैदिक पुराव्यावरून दिसून येत नाहीं. 'मित्रो जनान्यातयति ब्रुवाणः' (३.५९.१) या शब्दसमूहानेंच मित्राचें खरें प्रमुख वैशिष्ट्य दिग्दर्शित केलेलें आहे. मित्र

(२३) SAYCE नें आपल्या *Hibbert Lectures*, 1887, या ग्रंथात हें सूक्त उद्धृत केलें आहे.

(२४) E. HARDY. *Die ved.-br. Periode der Religion des alten Indiens*, 1893.

हा आपल्या आज्ञेने मानवांस योग्य स्थानीं ठेवतो, म्हणजेच त्यांचें नियंत्रण आणि नियमन करतो. यावरून मित्राचा मानवाच्या नियमनाशीं दृढ संबंध आहे हें स्पष्ट होतें. वेदांत मित्रास प्रामुख्याने ' यातयज्जन ' असें संबोधिलें आहे.

मित्रो भवसि देव धर्मभिः । ( ५.८१.४. )

यस्मै विष्णुस्त्रीणि पदा विचक्रम उप मित्रस्य धर्मभिः।(८.५२.३)

ऋतायं सप्त दधिरे पदानि

जनयन्मित्रं तन्वे३स्वायै । ( १०.८.४. )

इत्यादि ऋग्वेदीय उल्लेखांवरून मित्राचा ' धर्म ' आणि ' ऋत ' या कल्पनांशीं विशेष प्रकारचा संबंध असला पाहिजे याविषयी शंका उरत नाही. याच्या उलट, वैदिक पुराव्यावरून मित्र ही मूलतः सूर्यदेवता होती असें मुळींच सिद्ध होऊं शकत नाही. ' मित्र ' या शब्दाचा भाषाशास्त्रदृष्ट्या विचार करणें या ठिकाणीं अतिशय उद्बोधक ठरेल. ' मित्र ' या शब्दाचें मूळ रूप 'मित्रम्' असें नपुंसकलिंगी असलें पाहिजे, आणि तें एखाद्या धातूला ' त्र ' हा आगम लागून साधित झालें असल पाहिजे. ' त्र ' हा प्रत्यय लागून साधित आलेलीं अनेक धातुसाधित नामें वैदिक संस्कृतात आढळून येतात. उदाहरणार्थ, ' यु ' या धातूपासून ' योत्रम्, ' ' यम् ' पासून ' यन्त्रम् ', ' वृ ' पासून ' वृत्रम् ', ' चि ' पासून ' चित्रम् ' इत्यादि. ' मित्र ' या वैदिक रूपाचें यूरोभारतीय मूळ *mi-tro-m हें आहे, आणि तें यूरोभारतीय *m(e)i- म्हणजे ' बन्धनांत ठेवणें ' या धातूपासून साधलेलें आहे. संस्कृत— 'मेखला', लॅटिन—meimuri, ग्रीक—mitos किंवा mitre या शब्दांतहि त्याच यूरोभारतीय धातूचा आविर्भाव असल्याचें स्पष्ट दिसतें. यावरून ' मित्र ' याचा वाच्यार्थ 'बन्धन', आणि लक्ष्यार्थ ' सत्याचें बन्धन '

असा असावा. या नपुंसकलिंगी शब्दाचा पुढील विकास म्हणजेच 'मित्रः' हा 'बन्धनकर्ता' या अर्थाचा पुल्लिंगी शब्द[२५]. अवेस्तांतील 'मिथ्रेम् जन्' 'मिथ्रेम् द्रुज' यासारख्या शब्दप्रयोगांवरूनहि मिथ्र देवतेविषयीची मूळ कल्पना 'बन्धन' या कल्पनेवरच आधारलेली असल्याचें दिसून येतें. वेदांतील मित्र आणि अवेस्तांतील मिथ्र हे देव 'बन्धन', 'करार', 'सलोखा', तह' इत्यादि कल्पनांवर अधिष्ठित झाले असले पाहिजेत. मित्र हा सरोसरीच सूर्यस्वरूप असता तर तेजस्वितेकडे विशेष ओढा असलेल्या वैदिक कवींनी त्यास उद्देशून तेजःसूचक अशा निविदा नक्की निर्माण केल्या असत्या. पण ऋग्वेदांत अशा निविदा मुळींच आढळून येत नाहीत. सूर्यालाच 'मित्राचा चक्षु' असें म्हटलें आहे ही गोष्ट काय दर्शविते? अवेस्तांतील मूळ मिथ्रकल्पनेचा विकास पुढे 'सूर्य' या अर्थी झाला त्याला अनेक कारणें आहत.[२६] त्यांचा येथे विचार करणें अप्रस्तुत ठरेल. पण तशा प्रकारचीं कारणें वैदिक मित्राच्या बाबतींत कोणतींहि नव्हतीं हें मात्र येथे सांगितलें पाहिजे. वैदिक मित्र हा आपल्या मूळच्या आर्यकल्पित स्वरूपाशीं एकनिष्ठ राहिलेला आहे. तो मुख्यतः 'बन्धनाची', 'कराराची' अभिमानिदेवता असून आपल्या सामर्थ्यानें ऋताचें– विशेषतः मानवांतील नीतीचें, सुव्यवस्थेचें, सुसंघटनेचें–रक्षण करतो. श्राडरने आपल्या

(२५) सी. मी. ऊलेनबेक (*At. et. Wb.* 223) या भाषाशास्त्रज्ञानें 'मित्र' हा शब्द 'मयते' या धातूपासून व्युत्पादिला आहे, तर इतर कांहीं विद्वानांच्या मतें (पाहा के ब्रुगमान–*Gr. Gr.*[3] 74, fn 1) 'मित्र' हा शब्द भाषाशास्त्रदृष्ट्या लॅटिन *mitis* (= मृदु) किंवा लिथुआनियन *mylimus* (= प्रेममय) या शब्दांशीं संबद्ध आहे. परंतु युरोभारतीय *tro* हा प्रत्यय वरील मतांशीं विरोधी आहे व म्हणून तीं मतें ग्राह्य वाटत नाहीत.

(२६) पाहा · B Geiger *SAW Wien* 1916, 176, 7, 74; Eggers याचा पूर्वोल्लिखित ग्रन्थ, H Güntert. *Der arische Weltkonig*, 57 ff.

*Arische Religion* I ( आर्यधर्म ) या ग्रंथांत मित्रविषयक सर्व वैदिक उल्लेखांची विश्लेषणात्मक मांडणी केली आहे; त्यावरूनहि मित्राचें सूर्यस्वरूप मुळींच व्यक्त होत नाही. मागे उल्लेखिलेल्या बोगझक्वाय येथील उत्खननांत सापडलेल्या मृण्मुद्रेवर मि-इत्-र-अश्-शि-एल असा मित्राचा उल्लेख केलेला आहे. हिटाइटांचा राजा सुब्बिलिलिउम आणि मिटानींचा राजा मत्तिउआझ या दोघांमध्ये तह झाला, आणि त्या तहासंबंधीचें करारपत्रच या मृण्मुद्रेवर कोरलें आहे. या करारपत्राचे दैवी साक्षीदार म्हणून चार देवतांचा उल्लेख केलेला आहे. त्यांत मित्राचा उल्लेख प्रामुख्याने असावा हें वर वर्णिलेल्या त्याच्या व्यक्तिमत्त्वविशेषांवरून सयुक्तिकच वाटतें. ग्रीक भाषेमध्ये *ma ton mithrēn* असा एक शपथ घेण्याचा वाक्प्रचार आहे. मानवांच्या नीतिनियमांचा शास्ता या नात्याने मित्राच्या नांवाने शपथ घेतली जावी हेंहि अगदी योग्य असेंच आहे.

मित्राचें मूळ व्यक्तिमत्त्व हें असें असल्यामुळे, मित्र म्हणजे सूर्यदेवता या समीकरणावर आधारलेले सर्व सिद्धान्त साहजिकपणेंच ढासळून पडतात. ओल्डेनबेर्ग आणि हिलेब्रांट यांच्या सिद्धान्तांचा प्रारंभबिन्दु हें समीकरणच असल्यामुळे ते सिद्धान्त अर्थातच अग्राह्य ठरतात. आर्यांच्या देवताशास्त्रविषयक कल्पनांच्या विकासक्रमांत ज्यांना तेजःप्रतीकें म्हणतां येईल असे विचारप्रवाह फार उशीरा आले हें सहज दाखवितां येतें.

उपर्युक्त मौलिक प्रमादाव्यतिरिक्त चन्द्रसिद्धान्तांत अनेक इतर दोष आहेत. त्यांतील मुख्य म्हणजे त्या सिद्धान्तास वैदिक सूक्तांकडून मुळींच पुष्टि मिळत नाही हा होय. सूर्य हा वरुणाचा म्हणजे चन्द्राचा चक्षु आहे ( १-५०-६ ) असें म्हणणें हें चमत्कारिकच नाही का ? शिवाय, मित्र आणि वरुण हे जर अनुक्रमे सूर्य आणि चन्द्र यांचे द्योतक असतील तर एक प्रश्न साहजिकच उद्भवतो तो म्हणजे, वेदांत सूर्यापेक्षा चन्द्राला एवढें मोठें प्राधान्य कां देण्यात आलें ? ओल्डेनबेर्ग किंवा

लोमेल यांनी या बाबतींत दिलेला हवाला पटण्यासारखा नाही. कारण वैदिक धर्मकल्पना अमेरिकन आदिवासींच्या धर्मकल्पनांच्या अपेक्षेने बऱ्याच पुढारलेल्या असल्या पाहिजेत. विशेषतः वरुणविषयक कल्पनेंत तर एक प्रकारचा गंभीर अर्थ आहे. वैश्विक ऋतात्मक आधि-राज्य हेंच वेदांतील वरुण किंवा अवेस्तांतील अहुर मज्द् यांच्या व्यक्तिमत्त्वाचें सार आहे हें त्या त्या वाङ्मयांतील पुराव्याच्या आधारें मागे दाखविलें आहेच. वरुण म्हणजे चन्द्र या सिद्धान्ताने हें सर्व अप्रस्तुत आणि निरर्थक ठरतें. वैदिक वाङ्मयांतील वरुणविषयक इतर उल्लेखांचीहि अशीच स्थिति होईल. शिवाय, या बाबतीत असेंहि विचारतां येण्यासारखें आहे की वेदांत सूर्य आणि चन्द्रमा अशा स्वतंत्र देवता असतांना मित्र आणि वरुण या त्याच अर्थाच्या देवतांचें विशेष प्रयोजन काय? मूलतःच जर मित्र आणि वरुण हे अनुक्रमें सूर्यस्वरूप आणि चन्द्रस्वरूप असते तर वेदांतील त्यांच्या वर्णनांत भौतिक अंशांना निःसंशय अधिक प्राधान्य दिलें गेलें असतें. पण अशी वस्तुस्थिति नाही. वरुणाचे म्हणजेच चन्द्राचे 'पाश' यांचा अर्थ काय? हिलेब्रांटने आधार-भूत म्हणून मान्य केलेलें सोम म्हणजे चन्द्र हें समीकरण तरी कितपत ग्राह्य आहे? वेदांतील सोमसूक्तांचा आणि सोमविषयक इतर उल्लेखांचा सूक्ष्म अभ्यास केला तर असें दिसून येईल की सोमाचें चन्द्रस्वरूप हें मौलिक नसून दुय्यम, लाक्षणिक, कविकल्पित असें आहे. हिलेब्रांटने वरुणाचें सोमाशीं सादृश्य दाखवून तदनुरोधाने वरुण म्हणजे चन्द्रच असें प्रतिपादिलें आहे. वर सांगितलेल्या कारणांमुळे त्याचें हें प्रतिपादन अग्राह्यच ठरतें. शिवाय, हिलेब्रांटने ज्या वरुण आणि सोम यांच्या समभावावर विशेष भर दिलेला आहे तो तरी मौलिक समजतां येईल काय? विश्वसम्राट् वरुणाशीं सादृश्य सुचवून सोमाचें प्रस्थ वाढ-विण्याचा तो एक प्रयत्न असू शकेल आणि वेदांतच वरुण आणि चन्द्र यांचा शास्ता आणि शास्य या नात्याने एकत्र केलेला उल्लेख—

अदब्धानि वरुणस्य व्रतानि
विचाकशच्चन्द्रमा नक्तमेति । ( १.२४.१० )—हा
चन्द्रसिद्धान्तास अगदीं निश्चितपणें बाधक नाहीं काय ?

चन्द्रसिद्धान्ताच्या प्रवर्तकांनीं 'वरुण' या शब्दाच्या व्युत्पत्तीकडे मुळींच लक्ष पुरविलें नाहीं. आणि तो त्या सिद्धान्तांतील एक फार मोठा दोष समजला पाहिजे. त्यांनीं तौलनिक दैवतशास्त्राचाहि विचार केलेला दिसत नाहीं. कारण इतर कोणत्याहि युरोभारतीय दैवतशास्त्रांत चन्द्राला इतकें श्रेष्ठ स्थान दिलेलें नाहीं. ओल्डेनबेर्गनें असें सुचविलें आहे कीं वेदांतील वरुण-मित्र-आदित्य मंडल आणि अवेस्तांतील अहुर मज्द-मिथ्र-अमेश स्पेंत यांचें मंडल या दोन्हीं मंडलांची मूळ कल्पना आर्यांनीं सेमिटिक लोकांकडून घेतली असावी. आर्यांनीं वरुणाधिष्ठित आदित्यमण्डलाची कल्पना सेमिटिक लोकांकडून घेतली ही गोष्ट जर खरी मानावयाची तर सेमिटिक दैवतशास्त्रांत असल्या एखाद्या देवता मंडलाची कल्पना मूळचीच असली पाहिजे असें गृहीत धरावें लागेल. पण असें विशिष्ट प्रकारचें देवतामण्डल तर सेमिटिक दैवतशास्त्रांत अस्तित्वांतच नव्हतें. उदाहरणार्थ, बाबिलोनियन लोकांच्या ग्रहदेवतांचा एक सुसंघटित असा गट मुळींच नव्हता. शिवाय त्या ग्रहदेवतांपैकीं 'निनिब' 'नेरगळ' 'नेबो' इत्यादि देवतांचें आदित्यमंडलांतील 'अर्यमा', 'दक्ष', 'भग' इत्यादि देवतांशीं किंवा अमेश स्पेंत मंडलांतील 'वोहु मनह्' 'अश् वहिश्त' इत्यादि देवतांशीं व्यक्तिशः कांहींहि साम्य असल्याचें दिसून येत नाहीं. प्राचीन इराणी धर्मांत तर ग्रहांना 'अहूरिमन' च्या साहाय्यक दुष्ट शक्ति असें मानलें आहे.[२७] ओल्डेनबेर्गच्या म्हणण्याप्रमाणें वरुण हा सेमिटिक लोकांच्या 'सिन' नांवाच्या

(२७) ग्रहांशीं सामान्यपणें निगडित असलेला देववाद प्राचीन वैदिक वाङ्मयास मुळींच परिचित नाहीं ही गोष्ट या संदर्भांत ध्यानांत घेण्याजोगी आहे.

चन्द्रदेवतेशीं सदृश आणि मित्र हा 'षमष' नांवाच्या सूर्यदेवतेशीं सदृश असला पाहिजे. बाबिलोनियन दैवतशास्त्रांत 'सिन' ही देवता अगदींच सामान्य स्वरूपाची आहे. याच्या उलट, वरुणाच्या व्यक्तिमत्त्वांत, बाबिलोनियन 'षमष' या देवतेचेच कांहीं स्वभावधर्म उत्कटतेने दृष्टीस पडतात. या सर्व गोष्टींचा विचार केला की ओल्डेनबेर्गचें या बाबतींतील प्रतिपादन मुळींच मान्य नाही हें कळून येईल. वेदांतील आदित्यमंडलाची कल्पना सेमिटिक दैवतशास्त्रांतून घेतली गेली असण्याचा सुतरां संभव नाही.[२८]

वैदिक दैवतशास्त्राच्या अभ्यासाची योग्य पद्धति म्हणजे सुविज्ञात अशा हिंदु दैवतशास्त्रापासून–पुराणादि वाङ्मयापासून–प्रारंभ करून मागे मागे वैदिक वाङ्मयाकडे जाणें हींच आहे असें जर्मन पंडित पिशेल याचें मत आहे. हिंदु दैवतशास्त्रांत वरुणाविषयी उपलब्ध होणाऱ्या माहितीच्या आधारें पिशेल यानें असें प्रतिपादिलें आहे की हिंदु पुराणांत वर्णिल्याप्रमाणे वेदांतहि वरुण हा मुख्यतः समुद्राचा अधिपति होता.[२९] वरुणाचा पाण्याशीं प्रभूत आणि निरनिराळ्या प्रकारचा संबंध असल्याचें वेदांत दर्शविलें आहे (१.१६१.१४; ७.४९.३; ९.९०.२; अथर्व. ७.८३.१).

> अ॒प्सु ते॑ राजन् वरुण गृ॒हो हि॑र॒ण्ययो॑ मि॒थः
> ततो॑ धृतव्र॑तो राजा॒ सर्वा॒ धामा॑नि मुञ्चतु ॥ (अथर्व. ७.८३.१)

---

(२८) प्राचीन सेमिटिक लोकांची एकंदर विचारपद्धति लक्षांत घेतली तर असें दिसून येतें की त्या लोकांना 'मूर्त' स्वरूपाचा विचार करणें (concrete thinking) अधिक पसंत होतें. त्यामुळे वेदांतील वैश्विक–ऋत–प्रधान वरुणकल्पनेवर सेमिटिक विचारप्रवाहाचा पगडा पडला असेल हें मुळींच संभवत नाही.

(२९) R. PISCHEL. *Kultur der Gegenwart* I, VII, 165; *GGA* 1895, 6, 446 ff. HOPKINS. *Rel. of India*, 66.

या अथर्ववेदांतील उल्लेखावरून वरुणाचें स्थान पाण्यांत आहे हें स्पष्ट होतें. याच सिद्धान्ताच्या पुष्ट्यर्थ हॉपकिन्सने 'वरुण' आणि 'वारि' (= पाणी) किंवा 'वरी' (= नदी) या शब्दांचा भाषाशास्त्रदृष्ट्या संबंध असल्याचें सूचित केलें आहे प्रिझुल्युस्की या पंडिताच्या मतें 'वरुण' हें नांव 'वरु' या अनार्यांच्या समुद्र-देवतेच्या नांवाचा विकास असणें संभवनीय आहे. अशा रीतीनें तो समुद्रदेवतासिद्धान्तालाच पाठिंबा देतो.[30] ल्यूडर्सने याच सिद्धान्ताचा पर्याय म्हणून असें सुचविलें आहे की वरुण ही अखिल जगताच्या भोंवती असणाऱ्या जलाशयाची देवता आहे.[31]

हॉपकिन्सने सुचविलेला भाषाशास्त्रीय मुद्दा अगदी प्रमादपूर्ण आहे तसेंच प्रिझुल्युस्की यानें सुचविलेला 'वरुण' या वैदिक व 'वरु' या अनार्य शब्दांचा संबंधहि मूळचा असेल हें मुळींच शक्य वाटत नाही शिवाय, वैदिक वाङ्मयांतील उल्लेखांवरून हें स्पष्ट होतें की 'जल' किंवा 'समुद्र' हा वरुणाच्या अधिराज्याखाली येणाऱ्या विश्वाचा केवळ एक

(३०) J. Przyluski "Varuna, God of the Sea and the Sky" *JRAS* 1931

(३१) पृथ्वी आणि आकाश या दोहोंभोवती एक समुद्र आहे अशी वैदिक विश्वविज्ञानशास्त्रातील ( Vedic Cosmography ) एक कल्पना आहे ल्यूडर्सने वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाविषयी आणखीहि एक मत व्यक्त केलेलें आहे तें असें की वरुण हा 'शपथे' चा देव—God of oath—आहे ( *S B Berlin* 1910, 931 ). या दुसऱ्या मताच्या अनुरोधानें 'वरुण' या विषयावर त्या प्रख्यात जर्मन संस्कृतज्ञानें एक मोठा ग्रंथ लिहिलेला आहे. तो त्याच्या मृत्यूनंतर आता प्रसिद्धीच्या वाटेवर आहे त्या ग्रन्थाच्या द्वारा वेदविषयक अनेक प्रश्नांवर पुष्कळच नवीन प्रकाश पडेल अशी सर्व वेदाभ्यासकांची सकारण अपेक्षा आहे. वरुणदेवतेची आधारभूत कल्पना जलाची आहे—नुसत्या पृथ्वीवरील जलाची नाही तर मुख्यतः सर्वव्यापी वैश्विक जलाची आहे—असे मत आपटे यांनीहि पुढे मांडलें आहे ( *NIA* VIII, 136–156 ).

भाग आहे. तसेंच, जलदेवतेस विश्वसम्राट समजणेंहि फारसें सयुक्तिक होणार नाही. या बाबतींत आणखीहि एक शंका येऊ शकते. ती अशी: वैदिक आर्यांचा समुद्राशीं इतका निकटचा संबंध आला होता का की ज्यामुळे त्यांनी समुद्रदेवतेला आपल्या देवतामंडलांतील सर्वश्रेष्ठ आणि अत्युच्च असें स्थान द्यावें? ऋग्वेदांत वरुणाचीं म्हणून जीं इतर वैशिष्ट्यें उल्लेखिलीं आहेत तीं तरी समुद्रदेवतेस कुठे लागू पडतात? या सर्व गोष्टी विचारांत घेतल्यास पिशेलचा सिद्धान्त मुळींच प्रत्ययदायी नाही हें सहज समजून येईल.[३०] उत्तरकालीन हिंदु पुराणांत वरुणाला जलदेवता समजण्यांत आलें आहे या घटनेचें कारण अगदी निराळें आहे हें मला पुढे दाखवावयाचें आहेच!

वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाविषयी आणखी कांहीं कल्पना पुढे मांडण्यात आल्या आहेत त्यांचीहि येथे थोडक्यांत परीक्षा करणें प्राप्त आहे. मेयर याने आपल्या प्राचीन-भारतीय धर्मशास्त्रविषयक प्रबंधांत असें सुचविलें आहे की वरुण हा मुरुपत्तेंकरून रात्रिदेवता आहे.[३१] मोठीं पापें किंवा इतर अपराध हे सामान्यतः रात्रीच्या वेळींच घडतात; आणि रात्रिदेवता या नात्याने त्या पापांस आळा घालणें हें वरुणाचें प्रधान कार्य आहे नीतिशास्त्रदृष्ट्या वरुणास जें विशिष्ट महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे त्याचें कारण हेंच असें मेयरचें मत आहे. वरुणासंबंधी दुसरी एक नावीन्यपूर्ण कल्पना योहान्सन याने आपल्या 'प्राचीन भारतीय देवता, धिषणा' या अत्यंत विचारप्रेरक जर्मन ग्रंथात प्रति

(३०) ओल्डेनबेर्ग (*ZDMG* 50, 56–57) आणि हिलेब्रांट (*VM* III, 13) या पंडितांनी निःसंदिग्ध शब्दांत असं म्हटलें आहे की वरुणाच्या व्यक्तिमत्त्वांत समुद्रसंबद्ध असे अंश मुळींच नाहीत हिलेब्रांटने पुढे म्हटलें आहे की 'सूर्यासमुद्रौ' (म्हणजेच मित्रावरुणौ) अशी द्वन्द्वदेवता हिंदु देवताशास्त्रांत कधींच अस्तित्वांत नव्हती.

(३१) J. J. MEYER *Über das Wesen der altindischen Rechtsschriften*, 379–85.

पादिली आहे.[३४] त्याचें म्हणणें असें आहे की वेदांतील 'वरुण' आणि 'वृत्र' हे दोन्ही शब्द यूरोभारतीय *uel-lu या धातूपासून सिद्ध झालेले आहेत. आणि त्या धातूचा मूळ अर्थ 'बांधणें' 'बंधनांत ठेवणें' असा आहे. वृत्र आणि वरुण यांच्या स्वभावधर्मांतहि पुष्कळसें साम्य आहे असें योहान्सनचें मत आहे. वरुण आणि वृत्र हीं हिवाळ्याचीं, हिमऋतूचीं, दोन स्वरूपें आहेत — एक देवतास्वरूप आणि दुसरें दैत्यस्वरूप! आणि दोहोंच काम म्हणजे पाण्याला बन्धनांत ठेवणें फ्रेंच पंडित बेर्गेन्य याच्या मतेंहि वरुणाचें स्वरूप विशेषत्वानें 'अन्धकारमय' आहे. त्यानेहि वरुणाचें वृत्राशीं स्पष्ट असें सादृश्य कल्पिलें आहे.[३५] वरुण आपल्या पाशांनीं नद्यांना बन्धनांत ठेवितो. वरुणाचे पाश म्हणजे ज्या शक्तीमुळे हिमऋतु नदीप्रवाहांना आडवून ठेवतो त्या शक्तीचें केवळ प्रतीक आहेत. वेदांत इन्द्र आणि वरुण या दोघामध्ये दिसून येणारा विरोध हे इन्द्र आणि वृत्र या दोघांमधील विरोधाचेंच एक स्वरूप आहे. वैदिक वाङ्मयांत कांहीं कांहीं ठिकाणीं आढळून येणारे 'हेमन्तो हि वरुणः' (मै. सं. १-१०-१२) यासारखे उल्लेख किंवा वरुणप्रघास हा याग हिवाळ्याच्या प्रारंभीं करतात ही गोष्ट योहान्सनने आपल्या सिद्धान्ताच्या पुष्ट्यर्थ पुढे आणली आहे.

वरुण म्हणजे वृत्र या उपर्युक्त सिद्धान्ताचें खंडन करणें फारसें कठिण नाहीं. कारण वेदांत वरुण हा जलाचा सखा आणि स्वामी असल्याचें सूचविलें आहे. तो पाण्यास बंधनांत ठेवतो या गोष्टीचा वेदांत दूरतःहि उल्लेख असल्याचें आढळून येत नाहीं वैदिक वाङ्मयाचा, विशेषतः ऋग्वेदाचा,

---

(३४) JOHANSSON. *Über die altindische Göttin Dhiṣaṇā und Verwandtes.*

(३५) BERGAIGNE *La Religion Védique* III, 115, 128–29. पहा: HOPKINS. *Rel. of India*, 68; HILLEBRANDT. *VM* III, 37.

सूक्ष्म व चिकित्सापूर्ण अभ्यास केल्यास असें दिसून येइल की वैदिक देवतशास्त्रांत इन्द्र-वृत्र प्रधान आणि मित्र-वरुण-आदित्य-प्रधान अशा दोन परस्परव्यतिरेकी शाखा किंवा पंथ आहेत. आणि त्या दोन शाखांतून किंवा पंथांतून अगदीं भिन्न अशा कल्पना प्रामुख्यानें प्रतिपादिलेल्या आहेत म्हणून जरी कदाचित् 'वृत्र' आणि 'वरुण' हे शब्द एकाच समानार्थक धातूपासून साधतां येत असले, तरी त्यांना आधारभूत अशा मूळ कल्पना, तत्त्वाच्या व धर्मेतिहासाच्या दृष्टीनें, पूर्णपणें परस्परभिन्न अशाच आहेत. शिवाय ऋग्वेदांत वर्णिलेल्या वरुणाच्या शब्दचित्रांतील मुख्य छटा ध्यानांत घेतल्या तर मेयर किंवा योहान्सन यांना अनुसरून वरुण म्हणजे रात्रिदेवता, किंवा वरुण म्हणजे हिमऋतुदेवता असें म्हणणें हें बुद्धीला किती न पटणारें आहे हें कळून येईल. वेदांत वरुणास जें महनीय आणि उच्च स्थान प्राप्त झालें आहे तें रात्रिदेवतेला किंवा हिमऋतुदेवतेला एखाद्या देवतशास्त्रांत दिलें जाईल हा कल्पनाच अनाकलनीय आहे. हे किंवा अशा प्रकारचे सिद्धान्त ऋग्वेदांतील पुराव्याशीं अगदीं विसंगत असे वाटतात. जातां जातां हेंहि सांगावयास हरकत नाही की मेयर आणि योहान्सन यांनीच वरुणाविषयी दुसऱ्याहि उपपत्ति सुचविल्या आहेत. उदाहरणार्थ, योहान्सन हा वरुणास प्राचीन भारतांतील सर्वांत श्रेष्ठ अशी अपत्यत्व-देवता, fertility divinity, समजतो.[३६] वरुण ही लिङ्गदेवता असावी असें मेयरनें म्हटलें आहे.[३७] यावरून असें दिसतें की या पंडितांच्याच मनांत वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाविषयी कोणतीहि कल्पना निश्चितपणें सुप्रतिष्ठित झाली नव्हती. स्वतः उपपत्तिकारच जेव्हा आपल्या उपपत्तींविषयी साशंक असतात तेव्हा त्या उपपत्ति दुसऱ्यास प्रत्ययदायी कशा

(३६) JOHANSSON. उपर्युल्लेखित ग्रन्थ, पानें १०८ च्या पुढे.

(३७) MEYER. *Trilogie der altindischen Mächte und Feste der Vegetation*, 269 ff.

वाटणार ? तसेंच वरील सिद्धान्त पुढे मांडणारांनी सामान्यतः यूरो-भारतीय आणि विशेषतः वैदिक देवतशास्त्रविषयक विचारप्रणालींच्या विकासाकडे जवळजवळ दुर्लक्षच केल्यासारखें दिसतें.[३८]

वेदांतील वरुणाच्या व्यक्तिमत्त्वासंबंधीं चिकित्सापूर्ण आणि खोलवर विचार करीत असतां, एक गोष्ट तावडतोब आपल्या प्रत्ययाला येते ती अशी कीं वैदिक देवतामंडलांत वरुण–मित्र–अदिति–आदित्य यांचा जो एक सुसंघटित गण आहे त्या गणांतील देवतांच्या व्यक्तिमत्त्वांत आणि स्वभावधर्मांत, त्या देवता निसर्गांतील कांहीं शक्तींच्या द्योतक आहेत असें निश्चितपणें दर्शविण्याइतकीं लक्षणें मुळींच दिसून येत नाहींत. वैदिक देवतशास्त्राच्या अभ्यासकांत निसर्गशक्तिवाद्यांचा एक पंथ फार प्राचीन कालापासून अस्तित्वांत आहे. त्यांच्या मतें वेदांतील देवता म्हणजे निसर्गांतील कोणत्या ना कोणत्या तरी शक्तींच्या देवतीं

---

(३८) वरुणदेवतेसंबंधीं आणखीहि अनेक उपपत्ति वेदाभ्यासकांनीं पुढें मांडल्या आहेत. मित्र आणि वरुण या देवता सूर्याचा तेज आणि आर्द्रता यांच्या देवता होत्या असें घोष यांनीं म्हटलें आहे (*Aryan Trail in India and Iran* पान ९१ ९९) वरुणाचें व्यक्तिमत्त्व ज्योतिषशास्त्राच्या आधारें निश्चित करण्याचा कांहीं पंडितांनीं प्रयत्न केला आहे, आणि ती देवता म्हणजे ज्योतिषशास्त्रांतील एखाद्या घटनेची द्योतक असली पाहिजे असें सुचविलें आहे [पहा E. LITTMANN ' Die Gottin Aditi und die vedische Astronomie ' *ZII* 6, 1 R SHAMASASTRY ' The Ādityas *IA* XLI, 290 V M APTE (*LDCPI* V) यांच्या मतें ऋत म्हणजे नक्षत्रपथ आणि वरुण हा त्याचा स्वामी] तर दुसऱ्या कांहीं पंडितांनीं शारीरशास्त्राच्या आधारें वरुण म्हणजे आपल्या शरीरांतील पृष्ठवंश असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे (पहा V G RELE *Vedic Gods as Figures of Biology*). या व अशाच इतर कांहीं चमत्कृतिपूर्ण सिद्धान्तांचा विशेष परामर्श न घेतां ते मला मुळींच मान्य नाहींत एवढेंच मी येथें सांगूं इच्छितों

करणाचे परिणाम आहेत. निसर्गातील लहान मोठ्या शक्तींचे सहकार-संघर्ष देव-दैत्यांच्या सहकार-संघर्षांच्या प्रतीकांच्या द्वारा वेदांतील दैवतशास्त्रांत दर्शविले आहेत. या मताचें आपल्याकडे निरुक्तकार यास्कांनी आग्रहाने प्रतिपादन केलें आहे; आणि त्याचाच अनुवाद पहिल्या पहिल्या पाश्चात्य वेदाभ्यासकांनी केला आहे. वर दाखविलेंच आहे की या निसर्गशक्तिवाद्यांनी वरुणाच्या व्यक्तिमत्त्वासंबंधीं सुचविलेला कोणताहि सिद्धान्त पटण्यासारखा नाही. वेदांतील वरुण, आकाशदेवता, हिमऋतु-देवता, चन्द्रदेवता, किंवा जलदेवता यांपैकी एखाद्या, किंवा अशाच दुसऱ्या कोणत्याहि, निसर्गदेवतेशी सदृश नाही. वेदांत उपलब्ध होणारा पुरावा या सर्व सिद्धान्तांशीं विरोधी असाच आहे.

मग वरुणाचें मूळ सत्यस्वरूप तरी काय? वेदांत वर्णन केलेल्या वरुणाच्या विशेषांचा विश्लेषणपूर्वक अभ्यास करून, त्यावरून, वर एका ठिकाणीं सांगितलेल्या कसोट्यांस उतरेल असें वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाचें विधायक चित्र निर्माण करूनच या प्रश्नाचें उत्तर देतां येण्यासारखें आहे.

---

[ या आणि इतर परिशिष्टात मूळ व्याख्यानात आलेल्या सर्वच वैदिक उल्लेखांचें मराठी भाषान्तर दिलेलें नाहीं. ज्यांचे भाषान्तर देणें अवश्य वाटलें अशांचेंच दिलेलें आहे. मूळ व्याख्यानात हे उल्लेख ज्या क्रमानें आले आहेत त्या क्रमानेच त्यांचें भाषान्तर परिशिष्टांत दिलेलें आहे. तसेंच हें भाषान्तर मुद्दामच शक्य तितकें शब्दशः केलेलें आहे. अर्थात् या उल्लेखांचा मूळ ग्रंथांतील मागचा पुढचा संदर्भ पाहिल्याशिवाय त्यांच्या भाषान्तराचें खरें मर्म ध्यानांत येणें बरेंचसें कठिण आहे हें येथे सांगणें अवश्य वाटतें.]

# परिशिष्ट

## व्याख्यान पहिलें

### 'असुर' वरुण (१)

ऋ. ८.४१.३ : त्यानें [ वरुणानें ] ( अनेक ) रात्री ( आपल्यांत ) समाविष्ट करून घेतल्या आणि ( आपल्या ) मायेनें ( अनेक ) सकाळ प्रस्थापित केले असिल विश्वाभोंवतीं ( आवरण घातलेला असा ) तो दिसतो. त्यास प्रिय असलेल्या ( शक्तींनी ) ( त्यानें प्रस्थापित केलेल्या ) व्रतास अनुसरून तीन उषांचा पुरस्कार केला. ( 'नभन्तामन्यके समे' हें ध्रुपद या सूक्तांतील सर्व ऋचांच्या अंतीं येतें. त्याचा मुख्य सूक्ताच्या अर्थाशीं निकटचा संबंध असल्याचें दिसत नाहीं )

ऋ. ८.४१.७ : त्यानें [ वरुणानें ] ( विश्वाच्या सर्व ) विभागांवर आवरण घातलें. वरुणाच्या नेतृत्वाखालीं सर्व देव ( त्यानें प्रस्थापित केलेल्या ) व्रताचें पालन करतात.

( ही ऋचा अर्थाच्या दृष्टीनें बरीच क्लिष्ट आहे. तींतून सामान्यपणें निघणारा अर्थ वर दिलेला आहे. )

ऋ. ७.८७.५ : त्या (वरुणावरच) तिन्ही आकाशें प्रतिष्ठित आहेत. तेंच (त्याखालील) तिन्ही भूमींहि, सहा प्रकारांनी युक्त अशा, त्याच्या-वरच (अवलंबून) आहेत. शहाण्या वरुण राजाने आकाशांत हा सोनेरी झोंपाळा मांगल्यासाठी निर्मिला आहे.

[सोनेरी झोंपाळा = सूर्य (?)]

ऋ. ७.८७.६ : आकाशाप्रमाणे वरुणाने सिन्धु (निर्माण केला आणि) त्यांत तो अवतरला. जणू कांही एखादा शुभ्र तेजस्वी उदकबिन्दु (किंवा) एखादा बलशाली पशु!

ऋ. ८.४१.८ : दूर पसरलेला (किंवा अपार, गूढ) समुद्रच (असा तो वरुण) त्वरेने आकाशांत जणू कांहीं चढतो आणि त्या विभागा-मध्ये यज्ञाची (ऋताची) स्थापना करतो. आपल्या तेजस्वी चरणाने त्याने (विरोधी) मायेचा नाश केला आणि आकाशावर आरोहण केलें.

अथर्व. १३.३.१३ : तो अग्नि सायंकाळीं वरुण होतो; (आणि) सकाळीं उदयास येऊन मित्र होतो.

अथर्व. ९.३.१८ : वरुणाने (जें) बांधून ठेवलेलें (आहे तें [दार?]) मित्र सकाळीं मोकळें करो!

ऋ. ९.९५.४ : शिखरावर अधिष्ठित झालेल्या महिषाप्रमाणे किंवा पर्वतावर असणाऱ्या वृषभाप्रमाणे (भासणाऱ्या) सोमास स्वच्छ करून ते त्याचें दोहन करतात. (सर्व) सूक्तें शब्द करणाऱ्या (सोमाकडेच) जातात. वरुणरूप (सोमाला) त्रित समुद्रांत धारण करतो.

ऋ. ९.७३.८ : (ऋताच्या रक्षणकर्त्याने आपल्या) हृदयांत पवित्र (शुद्ध) करणाऱ्या तीन (वस्तु) ठेविल्या आहेत.

ऋ. ९.९७.५५ : एकावर एक पसरलेल्या तीन पवित्र (शुद्ध) करणाऱ्या वस्तूंकडे तूं जातोस.

ऋ. ६.७०.१ : वरुणाने आपल्या ऋताच्या योगाने पृथ्वी आणि आकाश हीं ( निरनिराळीं ) सावरून धरलेलीं आहेत.

ऋ. ९.१०१.१५ : ज्या (सोमाने) पृथ्वी आणि आकाश हीं सावरून धरलीं आहेत...

ऋ. ५.८१.४ : (हे सवितृदेवा) आपल्या धर्मांच्या ( नियमांच्या-कायद्यांच्या ) योगाने तूं मित्र ( -देवतास्वरूप ) होतोस.

ऋ. ८.५२.३ : मित्राने घालून दिलेल्या धर्मा( नियमा )नुसार ज्याच्याकडे विष्णु आपलीं तीन पावलें टाकून गेला....

ऋ. १०.८.४ : ऋतासाठी, ( तसेंच ) आपल्या स्वरूपासाठी, मित्रास निर्माण करून तूं सात स्थानें आक्रमितोस.

ऋ. १.२४.१० : वरुणाने घालून दिलेले नियम अनुल्लंघनीय आहेत. ( उदाहरणार्थ, ) सुप्रकाशित होऊन ( नियमानुसार ) चन्द्र रात्रीं येतो.

अथर्व. ७.८३.१ : हे वरुण राजन्, तुझ्यासाठी पाण्यामध्ये एक हिरण्मय घर बांधलें आहे. तेथून धर्माचें धारण करणारा राजा [ वरुण ] सर्व पाश मोकळे करो.

( या मन्त्रांत 'मिथः' ऐवजी 'मित', आणि 'धामानि' ऐवजी 'दामानि' असे मूळचे पाठ असावेत. ते लक्षांत घेऊनच वरील अर्थ दिलेला आहे. )

---

# वैदिक देवतांचें अभिनवदर्शन

## व्याख्यान दुसरें

## 'असुर' वरुण (२)

वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाविषयी जे प्रमुख सिद्धान्त विद्वानांनी आतापर्यंत पुढे मांडले आहेत, आणि ज्या सिद्धान्तांना बरीचशी मान्यताहि मिळाली आहे, त्यांची विश्लेषणपूर्वक परीक्षा करून ते कसे प्रमादपूर्ण, अत एव अस्वीकार्य, आहेत हें काल मी दाखविलें—आणि असा प्रश्न उपस्थित केला की मग वरुणाचें सत्यस्वरूप तरी काय ? याच प्रश्नाचें उत्तर आज आपणांस शोधावयाचें आहे.

सर्व वैदिक देवतामध्ये 'असुर' हें बिरुद वैदिक कवींनी जर विशेषत्वाने कुणासंबंधी उपयोजिलें असेल तर तें वरुणासंबंधी ! वेदांतील पुढीलसारख्या अनेक उल्लेखांवरून ही गोष्ट सहज पटण्यासारखी आहे.

> क्षयंन्नस्मभ्यमसुर प्रचेता
> राजन्नेनांसि शिश्रथः कृतानि। ( १.२४.१४ )
>
> त्वं विश्वेषां वरुणासि राजा
> ये च देवा असुर ये च मर्ताः। ( २.२७.१० )
>
> मा नो वधैर्वरुण ये त इष्टा—
> वेनः कृण्वन्तमसुर भ्रीणन्ति। ( २.२८.७ )
>
> अस्तभ्नाद् द्यामसुरो विश्ववेदा
> अमिमीत वरिमाणं पृथिव्याः। ( ८.४२.१ ).

लोकांमध्येहि अशा प्रकारची कल्पना अस्तित्वांत होती असें अनुमान करणें मानवेतिहासाच्या दृष्टीनें तर सयुक्तिक ठरतेंच–पण त्या अनुमानाला भाषाशास्त्रीय आणि वाङ्मयीन पुराव्याचा पाठिंबाहि भरपूर मिळतो. या सर्व विषयाच्या अधिक खोलांत न शिरतां मी येवढेंच म्हणेन की वैदिक 'असु' ही वर वर्णिल्याप्रमाणेच एक रसात्मक सर्वव्यापी यातुशक्ति होती असें दाखवितां येण्यासारखें आहे. आणि 'असु' चें हेंच स्वरूप प्राचीन वैदिक कवींनी मान्य धरलें आहे.[३] ('असु' या शब्दाचा अस् या धातूशीं सामान्यतः दाखविण्यांत येणारा संबंध भाषाशास्त्रदृष्ट्या बरोबर नाहीं हें येथे सांगितलें पाहिजे.) ज्याच्याजवळ ही यातुशक्ति अतिशय मोठ्या प्रमाणांत व फार उत्कटत्वानें आहे तो 'असुर'! त्याचा प्रभाव सर्व प्राणिमात्रांवर आणि वस्तुजातावर अप्रतिहतपणें चालतो. वरुणास 'असुर' समजण्यांत येतें तें यामुळेंच की तो आपल्या यात्वात्मक 'असु' शक्तीच्या प्रभावानें सर्व विश्वावर आपलें अधिराज्य गाजवूं शकतो.

असुर वरुणाच्या या 'असु' संपादित, अनन्यसाधारण शक्तीस वेदांत 'माया' असें नांव दिलेलें आहे. वरुणास विशेषत्वानें 'मायिन्' असें संबोधितात त्याचें कारण हेंच! 'माया' या शब्दाचा तरी अर्थ काय हें पाहणें या ठिकाणीं मोठें उद्बोधक ठरेल. गेल्डनेर या सुविख्यात वेदज्ञानें 'माया' हा शब्द 'मीयते', 'मिनाति', किंवा 'मिनोति' या 'कमी करणें', 'अडविणें' किंवा 'विरोध करणें', 'दुखविणें' अशा अर्थाच्या धातूंपासून व्युत्पादिला आहे.[४] पण या व्युत्पत्तीनें 'माया' या शब्दास एक प्रकारचा नकारात्मक, नास्तिगर्भ, negative अर्थ प्राप्त होतो. आणि शिवाय

(३) याविषयी सविस्तर विवेचनासाठीं पहा: DANDEKAR, *Der vedische Mensch*, Heidelberg 1938.

(४) K. GELDNER. *Glossar zum RV*, 135.

त्या अर्थास वैदिक वाङ्मयाची पुष्टीहि मिळत नाही. 'माया' या शब्दानें अशी एक विशिष्ट प्रकारची शक्ति सुचविली जाते की जिच्या स्वरूपाची नुसती कल्पना करणेंहि सामान्य मानवास शक्य नाही. 'माया' ही शक्तीहि यात्वात्मकच आहे— magical आहे. या शक्तीमुळेच अद्भुत आणि अलौकिक कार्यें साध्य होतात. उदाहरणार्थ, सामान्य मानवाच्या बुद्धीस अगम्य वाटणारें या प्रचंड निसर्ग-शक्तींच्या प्रवर्तन-नियमनादींचें काम हें 'माये' मुळेच शक्य होतें. आणि तें काम वरुणास शक्य झालें आहे म्हणूनच तो खरा मायी! 'माया' या शब्दास हा अर्थ कसा प्राप्त झाला हें आता पाहिलें पाहिजे. भाषाशास्त्रदृष्ट्या 'माया' हा शब्द 'मिमाति' किंवा 'मिमीते' या धातूपासून व्युत्पादावयास पाहिजे. या धातूचा अर्थ केवळ 'मोजणी करणें', 'गणना करणें' एवढाच होत नसून 'निर्माण करणें', 'व्यवस्थापन करणें' असाहि होतो— किंबहुना मूलतः असाच होतो असें म्हटलें तरी चालेल. यावरून असें दिसून येईल की, 'माया' ही एक योजना-प्रधान, निर्माणात्मक, घटनात्मक, विरचनात्मक अशी शक्ति आहे. "'माया' हा शब्द वेदांत अनेकदा प्रत्यक्षपणें 'मा' या धातूशीं संलग्न केला गेला आहे हें नायसर याने दाखविलेंच आहे." उदाहरणार्थ .

ते मायिनो ममिरे सुप्रचेतसः । ( १.१५९.४ )

अन्यदन्यदसुर्यं१ वसाना

नि मायिनो ममिरे रूपमस्मिन् । ( ३.३८.७ )

मायाविनो ममिरे अस्य मायया । ( ३.८३.३ ).

तौलनिक भाषाशास्त्रदृष्ट्याहि या शब्दाचा ग्रीक *mētis* (= चतुर), लिथुआनियन— *monas* (= यातु, अद्भुत), स्लाव्होनिक— *mĕtoka*

(५) NEISSER. *Hillebrandt Comm. Vol.*; HILLEBRANDT. *WZKM* 13, 316 ff.

तेव्हा 'असुर' या शब्दाचा बरोबर अर्थ जर आपणांस समजला तर वरुणाविषयींचें कोडें सहज उलगडेल असें मला वाटतें. प्रथमतः ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे की 'असुर' हा वैदिक शब्द 'सुर' या संस्कृत शब्दापेक्षा फार प्राचीन आहे. एवढेंच नव्हे, तर 'असुर' हाच शब्द मूळचा आहे. त्या शब्दाच्या मूळच्या अर्थाचा विसर पडून, आणि त्यांतील 'अ' हें अक्षर नकारसूचक आहे अशी गैरसमजूत होऊन, 'सुर' हा शब्द पुढील काळांत कृत्रिमपणें साधला गेला आहे. 'असुर' हा शब्द 'असु' आणि 'र' या दोन शब्दांनी साधला आहे. त्यांपैकी 'र' हा एक प्राचीनकालीन प्रत्यय असून त्याचा अर्थ 'स्वाधीनता असणारा', 'मालकी असणारा' असा आहे. 'र' हा एक possessive termination आहे. 'धीर', 'श्रीर' इत्यादि शब्दांतहि हा प्रत्यय दिसून येतो. म्हणून 'असुर' या शब्दाचा अर्थ 'ज्याच्याजवळ विशेषत्वाने असु आहे असा' असा होतो. 'असु' म्हणजे काय ? भाषाशास्त्राच्या तसेंच मानवेतिहासाच्या आधारें असें स्पष्टपणें दाखवितां येतें की अत्यंत प्राचीन मानवाच्या दृष्टीने सर्व विश्वाचा व्यापार आणि धारणा हीं मानवीकल्पनातीत अशा एका शक्तीच्या योगें होत असतात. ही शक्ति म्हणजे एक magic potence—यात्वात्मक शक्ति—आहे. आणि ती केवळ कल्पनारूप —अमूर्त— नसून प्रत्यक्ष रसमय आहे. या सन्दर्भात मीं 'यातु' हा जो शब्द वापरला आहे त्या शब्दाचा कुत्सितार्थ किंवा लौकिकार्थ ( vulgar sense ) मला मुळींच अभिप्रेत नाही हें येथे मुद्दाम स्पष्ट केलें पाहिजे. इंग्रजींतील magic या शब्दानें जो एक विशिष्ट अर्थ सूचित होतो— विशेषतः मानवीविचारविकास-क्रमाच्या दृष्टीनें सूचित होतो— तो अर्थच मला 'यातु' या शब्दानें

अभिप्रेत आहे.[१] देव, मानव, पशु, आणि विश्वांतील इतर वस्तु या सर्वांमध्ये हा यात्वात्मक रस असतो; आणि त्यामुळेच, त्या सर्वांचें धारण व व्यापार शक्य होतात. हा रस म्हणजे सर्व प्रकारच्या जीवनाचें सारच होय. आणि विश्वांतील सर्व जीवांतील व वस्तुमात्रांतील सार एकाच स्वरूपाचें असल्यामुळे प्राचीन मानवाच्या दृष्टीनें निरनिराळ्या वस्तूंत सारात्मक भेद (essential difference) असा मुळींच अस्तित्वांत नव्हता. देव, मनुष्य, पशु, आणि इतर वस्तु यांमध्ये जो कांहीं भेद दृष्टीस पडतो, त्याचें कारण म्हणजे त्यांच्यांत हा यात्वात्मक रस भिन्न भिन्न प्रमाणांत अस्तित्वांत असतो हेंच होय. या यात्वात्मक रसशक्तीला 'Mana', 'Orenda', 'Tondi' अशीं निरनिराळीं नांवें निरनिराळ्या प्राचीन मानवकुलांनीं दिलेलीं आहेत.[२] हीं नांवें जरी भिन्न असलीं तरी त्यांस आधारभूत असलेली सर्वव्यापी रसात्मक यातुशक्तीची कल्पना मात्र सर्वत्र एकच आहे. एखाद्या व्यक्तींत किंवा वस्तूंत (प्राचीन मानवाच्या दृष्टीनें 'व्यक्ति' आणि 'वस्तु' भिन्न नसतात) हा रस जितक्या अधिक प्रमाणांत असेल तितकें त्या व्यक्तीचें किंवा वस्तूचें वर्चस्व, बल, किंवा जीवनशक्ति अधिक असें समजलें जात असे. यातुविद्येच्या योगें आपल्यांतील या यात्वात्मक रसशक्तीचें प्रमाण वाढवितां येत असे किंवा दुसऱ्यांतील कमी करतां येत असे. इतर प्राचीन मानवांप्रमाणे प्राचीन यूरोभारतीय किंवा आर्य

(१) उदाहरणार्थ, मानवविचारविकासक्रमांतील Magic (यातु), Religion (धर्म), आणि Science (विज्ञान) अशा तीन प्रमुख पायऱ्या आहेत असें विधान करतांना Magic या शब्दाचा जो अर्थ अभिप्रेत असतो तोच मला 'यातु' या शब्दानें अभिप्रेत आहे. याविषयीं अधिक विवेचनासाठीं प्रस्तुत लेखकाचें *PAIOC* 1948, Darbhanga, या ग्रंथांत प्रसिद्ध झालेलें व्याख्यान पहावें.

(२) Güntert — यांच्या उपर्युल्लिखित ग्रंथांत पान १०० व पुढे

(=अलौकिक व्यक्ति किंवा वस्तु) या यूरोभारतीय शब्दांशीं संबंध असल्याचें दाखवितां येईल.

'असुर' आणि 'माया' या दोन शब्दांना आधारभूत असलेल्या विशिष्ट कल्पनांचें एकदा सम्यक्तया आकलन झालें कीं वरुणाच्या खऱ्या व्यक्तिमत्त्वाचें व स्वभावाचें ज्ञान करून घेणें सुकर होईल. अखिल विश्वाचा निर्माता आणि विशेषतः नियन्ता या दृष्टीनें वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाचा विचार करूं लागलों तर त्यास 'असुर' आणि 'मायिन्' असें संबोधिलें जातें तें अगदी योग्यच आहे असें आपणांस कळून येईल. प्राचीन वैदिक मानवाच्या मतें हें प्रचंड विश्व निर्माण करून त्याचें व्यवस्थापूर्वक नियमन करणें हें अद्भुत काम 'असु'नामक यातुशक्ति अत्यंत प्रभूत प्रमाणांत जवळ असलेल्या 'असुरा' खेरीज कोणालाहि शक्य होणार नाही. आणि ही शक्ति वरुणाजवळ मोठ्या प्रमाणात आहे तो जगांतील सर्वांत बडा जादूगार आहे. पुढे दिलेल्या वैदिक मंत्रांत याच गोष्टीचा विशेषत्वानें उल्लेख केलेला आहे.

अमी य ऋक्षा निहितास उच्चा
नक्तं ददृश्रे कुह चिद्दिवेयुः ।
अदब्धानि वरुणस्य व्रतानि
विचाकशच्चन्द्रमा नक्तमेति ॥ (१·२४·१०)
चित्रेभिरभ्रैरुप तिष्ठथो रवं
द्यां वर्षयथो असुरस्य मायया ॥ ( ५·६३·३ )
उवाच मे वरुणो मेधिराय
त्रिः सप्त नामाघ्न्या बिभर्ति ।
विद्वान्पदस्य गुह्या न वोचद्
युगाय विप्र उपराय शिक्षन् ॥ ( ७·८७·४ ).

एका वैदिक मंत्रांत तर (७·८८·६) वरुणास साक्षात् 'यक्षिन्' म्हणजे जादूगार असें म्हटलें आहे, आणि दुसऱ्या एका मंत्रसमूहांत (५.८५.२-६) असुर वरुणाच्या यातुशक्तीच्या प्रभावाचें मोठें चित्रोपम वर्णन केलेलें आहे. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलांतील एकेचाळिसाव्या सूक्ताचा मुख्य विषयहि वरुणानें आपल्या मायाशक्तीमुळे संपादिलेल्या अलौकिक अद्भुताचा गौरव करणें हाच आहे. उच्च आकाशांत दररोज, नेमानें, न चुकतां सूर्य आपला मार्ग आक्रमतो; चन्द्राच्या योजनाबद्ध रीतीनें रोज बदलणाऱ्या कला प्रतिरात्रीं आकाशांत दृष्टीस पडतात; असंख्य तारका योजनाबद्ध रीतीनेंच आकाशांत चमकतात; नद्या आपला आखून दिलेला प्रवाहाचा मार्ग सामान्यतः सोडत नाहीत; एका-मागून दुसरा असे सर्व ऋतु नित्य त्याच क्रमानें निसर्गांत आविर्भूत होतात. प्राचीन वैदिक आर्य निसर्गांतील या सर्व घटना पाहत असे, आणि त्यामुळे त्यास विस्मय वाटत असे. या घटनांचें प्रवर्तन आणि नियमन एखादी अदृश्य शक्ति करीत असली पाहिजे, त्याविना हें शक्य होणार नाहीं अशी प्राचीनमानवसुलभ कल्पना त्याच्या मनांत येणें साहजिकच होतें. हें विश्व 'प्रचंड' आहे, 'तेजस्वी' आहे ही एकच गोष्ट प्रथम त्याच्या मनावर मोठा परिणाम करीत असे. आणि तें साहजिकच होतें. परंतु या 'प्रचंड' आणि 'तेजस्वी' विश्वाचा आपल्या बुद्धयनुसार तो जेव्हा अधिकाधिक विचार करूं लागला, तेव्हा त्यास दुसरा एक महत्त्वाचा–त्याच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचा–शोध लागला. तो असा कीं हें विश्व केवळ 'प्रचंड' आणि 'तेजस्वी' आहे एवढेंच नव्हे तर तें 'नियमबद्ध' हि आहे–'व्यवस्थापूर्ण' हि आहे' हें विश्व chaos–संकुल किंवा अस्ताव्यस्त–नसून, cosmos–सुषम, योजनाबद्ध, व्यवस्थित–आहे, अशी त्याला प्रतीति झाली. या विश्वाच्या घटनांमागे–मानवाच्या आणि निसर्गाच्याहि–एक law, धर्म, किंवा कायदा आहे; आणि त्याच्या अनुरोधानेच त्या घटना

घडून येतात. पण त्या ' law ' चें, ' धर्मा ' चें, किंवा ' कायद्या ' चें स्वरूप प्राचीन मानवांच्या बुद्धीस अगम्य राहिलें. आणि त्या धर्माच्या अलौकिकत्वामुळे, अद्भुततेमुळे, अगम्यतेमुळे त्याने एखाद्या ' असुर ' ची ' माया ' किंवा यातुशक्ति या विश्वाच्या घटनेस आणि नियमनास जबाबदार असली पाहिजे असें आपल्या बुद्ध्यनुसार कल्पिलें. Mana, Orenda, किंवा असु या निरनिराळ्या नांवांनी ओळखली जाणारी रसात्मक यातुशक्ति बऱ्याच मोठ्या प्रमाणांत जवळ असलेला एखाद-दुसरा मानव प्रत्येक प्राचीन मानवकुलांत असे. त्या प्राचीन मानव-कुलांतील ' धर्म ', ' आरोग्य ' आणि ' यातु ' यांचें रक्षण करण्याची जबाबदारी त्या मानवावरच असे. तोच त्यांचा ruler - priest - medicineman - and magician - in - one असा असे. मोठमोठा अद्भुत — म्हणजे सामान्य मानवाच्या बुद्धीस अगम्य अशीं — कृत्यें त्याला सहजसाध्य असत. आणि याचें कारण म्हणजे त्याच्या जवळची रसात्मक यातुशक्ति — असु ! प्रचंड विश्वाच्या प्रवर्तन नियमनांत भासमान होणाऱ्या अद्भुततेचा अन्वय प्राचीन मानवाने आपल्या नेहमीच्या अनुभवाच्या साहाय्याने लावण्याचा प्रयत्न केला. मानवकुलाप्रमाणे या प्रचंड विश्वांतहि एखादा ruler-priest-medicineman-and magician-in-one-एखादा ' असुर '—असला पाहिजे. आणि तोच आपल्या यातुशक्तीच्या योगाने हें विश्वनियमनाचें अद्भुत काम करीत असला पाहिजे वैदिक वरुणाची ' माया ' म्हणजे विश्वाच्या प्रवर्तन-नियमनाची त्याची शक्ति ! आणि त्या शक्तीचें कारण म्हणजे त्याचें असुरत्व ! ! प्राचीन मानवाच्या वैचारिक विकासांत अशी कल्पना अनेक मानवकुलांत उद्भवलेली आपणास दिसून येईल. प्राचीन ऑस्ट्रेलियन लोकांची ' वेजामि ' देवता, उत्तर अमेरिकेंतील आल्गोन्कीन लोकांची ' अतहोकन ' देवता, इरोकांची ' जोस्केहा ' देवता, त्संडालाची ' व्होतान ' देवता, नोव्हावो लोकांची ' अट्सोन्लुथ ' देवता—

या सर्व देवता बऱ्याच अंशीं वैदिक वरुणाच्याच प्रतिमूर्ति आहेत असें म्हणावयास प्रत्यवाय नाही. अर्थात् या सर्व देवतांच्या मानाने वेदांतील वरुणास, आणि अवेस्तांतील अहुर मज्दास, अधिक उन्नत आणि प्रभावी व्यक्तिमत्त्व दिलें गेलें आहे हें मात्र निःसंशय!

वरुण या प्रचंड विश्वाचें प्रवर्तन आणि नियमन करतो, तें आपल्या 'माये'च्या योगें; आणि ही 'माया' त्याला प्राप्त झाली ती त्याच्या 'असुरत्वा' मुळे हें आपण पाहिलें. पण विश्वाचें हें प्रवर्तन आणि नियमन वरुण कसें करतो? याविषयी प्राचीन वैदिक कवींची काय कल्पना आहे? या प्रश्नांचें उत्तर आपणांस सांपडतें किंवा कसें तें आता पाहूं! यासाठी प्रथमतःच 'वरुण' या शब्दाचें भाषाशास्त्रदृष्ट्या विश्लेपण आणि विवरण करणें जरूर आहे असें मला वाटतें. 'वरुण' हा शब्द भाषाशास्त्रज्ञांनी निरनिराळ्या रीतींने व्युत्पादिला आहे. त्यापैकी सर्व-सामान्यपणें स्वीकृत झालेली अशी व्युत्पत्ति म्हणजे 'वृ' (= आवरण घालणें, झाकणें, समावेश करणें) या धातूपासून. पण ही व्युत्पत्ति कशी प्रमादपूर्ण आहे, हें मागे दाखविलेंच आहे. मेये या फ्रेंच भाषाशास्त्रज्ञाने या बाबतींत दुसरी व्युत्पत्ति सुचविली आहे. त्याच्या मतें 'वरुण' हा शब्द यूरोभारतीय *uer-ure या 'बोलणें' अशा अर्थाच्या धातूपासून साधलेला असला पाहिजे.[१] त्याच धातुपासून 'व्रत' हा वैदिक शब्दहि सिद्ध झाला आहे. वरुण आणि व्रत (= आज्ञा; नियम; धर्म) यांचा निकटचा संबंध मेयेने आपल्या व्युत्पत्तीच्या द्वारा दर्शविला आहे. या दृष्टीने पाहिलें म्हणजे वरुण हा मुख्यतः 'आज्ञापक' देव आहे असें सिद्ध होतें. मेयेने 'वरुण' या शब्दाचा भाषाशास्त्रदृष्ट्या प्राचीन बुल्गेरियन– *rota* (= शपथ) किंवा ग्रीक– *rêtor* या अन्य यूरो-भारतीय शब्दांशीं संबंध असल्याचें सुचविलें आहे. या प्रश्नाचा अधिक खोलवर विचार केला तर असें दिसून येईल की मेयेने सुचविलेली

(१) MEILLET. JA 1907, II, 156.

यूरोभारतीय भाषांत सापडतात. उदाहरणार्थ, प्राचीन उच्च जर्मन— *art* (= पद्धति, रूढि, वळण), आर्मेनियन–*ardar* (= धर्मानुसारी), आणि विशेषतः संस्कृत — ऋत (वैश्विक धर्म). आता उल्लेखिलेल्या शब्दांना एक प्रकारचा नीत्यात्मक–धर्मात्मक – विशेष अर्थ प्राप्त झाला आहे हें दिसून येईल. वेदांतील 'ऋत' म्हणजे एक पवित्र नैतिक बन्धन आहे—तो एक अनुल्लंघनीय आणि विश्वव्यापी असा कायदा आहे. आणि हेंच नैतिक बन्धन किंवा हाच विश्वव्यापी कायदा अखिल विश्वांतील घडामोडींचा आधार आहे. याच कायद्याच्या योगें सर्व वैश्विक शक्तींना योग्य प्रकारें बन्धनात ठेवून वरुणाने विश्वांत एक प्रकारची अभेद्य सुसंघटितता निर्माण केली आहे. अथर्ववेदात 'ऋतस्य तन्तु' (२·१·५; १३·३·१९) अशा प्रकारचा जो उल्लेख येतो तो ऋतासंबंधीं वर केलेल्या प्रतिपादनास पुष्टि देणाराच आहे. ऋताचा मार्ग तेजाच्या तन्तूनीं विणलेला आहे ही हृद्य कविकल्पना वर सांगितलेली गोष्टच सुचवितें:

अद॑र्शि <u>गातुरुरवे</u> वरी॑यसी पन्था॑ <u>ऋतस्य</u> सम॑यंस्त <u>रश्मिभि</u>-

श्चक्षु॒र्भग॑स्य <u>रश्मिभिः</u>। (१·१३६·२).

म्हणजे आता असें म्हणावयास हरकत नाहीं कीं 'ऋत' हा विश्वाचा कायदा, आणि त्या कायद्याच्या अनुरोधानें विश्वाचें नियमन करणारा वरुण हा विश्वसम्राट्! भाषाशास्त्रदृष्ट्या या दोन्ही शब्दांची सिद्धि एकाच अर्थाच्या यूरोभारतीय धातूपासून झालेली आहे. आणखीहि एक विचार या संदर्भात सुचविता येण्यासारखा आहे. आणि तो म्हणजे cosmos या शब्दासंबंधीं Cosmos हा शब्द chaos या शब्दाचा विरोधी आहे. आणि त्याचा अर्थ 'सुसंघटित विश्व' असा आहे. आता cosmos हा शब्दहि **kent* या यूरोभारतीय धातूपासून सिद्ध झालेला आहे, आणि त्या धातूचा अर्थहि 'बन्धनांत ठेवणें'

असाव आहे असें ग्युंटर्ट या भाषाशास्त्रज्ञानें सिद्ध केलें आहे.[9] म्हणजे 'बन्धनामुळे सुसंघटितता' ही कल्पना सर्व प्राचीन मानवकुलांत अस्तित्वांत होती असें दिसून येतें.

वरुणाच्या अदिति आणि विशेषतः आदित्य यांच्याशी असलेला संबंध हें त्याच्या व्यक्तिमत्त्वाचें एक प्रमुख अंग आहे. 'अदिति' आणि 'आदित्य' या शब्दांचा मूलाधारहि बन्धनाची कल्पना हाच आहे. हे शब्द युरोभारतीय *$d\bar{e}$ (= बन्धनांत ठेवणें)—संस्कृत – दा (= बांधणें) या धातूंशीं भाषिकदृष्ट्या सबद्ध आहेत. वरुणाच्या पाशांनीं—त्याच्या वैदिक बन्धनांनीं—सर्व विश्व जरी बद्ध असलें तरी त्याचे निकटचे सहकारी मात्र—जे या विश्वसम्राटाच्या शक्तीच्या निरनिराळ्या रूपांचे द्योतक आहेत ते—त्या बन्धनांतून मुक्त आहेत. आणि हे साहजिकच नाहीं का ? हे सहकारी या विश्व-जादूगाराच्या जाळ्यांत सांपडत नाहींत—त्यांना विश्वसम्राटानेच, इतरांच्या मानानें, थोडें अधिक स्वातंत्र्य दिलेलें आहे.[10] आणि म्हणूनच त्यांना 'आदित्य' म्हणजे 'अबद्ध', 'बन्धनांत न सांपडलेले' असें अगदीं अनुरूप नामाभिधान प्राप्त झालेलें आहे. ब्लूमफील्ड या अमेरिकन विद्वानानें 'आदित्य' या शब्दाचा 'आदि' या शब्दाशीं संबंध जोडून तद्द्वारा आदित्यदेवता या विश्वप्रारंभकालीन मूळ देवता होत्या असें सुचविलें आहे.[11] अर्थात् भाषाशास्त्रदृष्ट्या त्याचें म्हणणें प्रमादपूर्ण आहे. आदित्य हे विश्वसम्राट् असुर वरुणाच्या प्रभावळींतील प्रमुख आहेत. म्हणून वरुणाच्या आज्ञेनें इतरांना बंधनांत ठेवणें हे आदित्यांना शक्य आहे, त्यांना मात्र कोणीहि बन्धनांत ठेवूं शकत नाहीं. मित्र (= बन्धनांत

(९) GÜNTERT. उ. म, पानें १८८–८०.

(१०) उदाहरणार्थ पुढील वैदिक सूक्तें पाहा : २.२७, ७.८२, ८.४७, ८.६७.

(११) M. BLOOMFIELD. "The Symbolic Gods". *Gilderseeve Vol.*, 45; *Rel. of Veda*, 131.

व्युत्पत्ति समाधानकारक नाही. कारण *ụer – ure या यूरोभारती धातूपासून उकारात्मक शब्द व्युत्पन्न झालेले मुळींच आढळत नाहींत तौलनिक भाषाशास्त्रदृष्ट्या 'वरुण' या शब्दाची व्युत्पत्ति यूरोभारतीय *ụer या 'बन्धनांत ठेवणें', 'बांधणें' या अर्थाच्या धातूपासून झाली आहे असें मानणें हेंच अधिक बरोबर होईल. लेटिश– *weru wert* (= बांधणें), प्राचीन बुल्गेरियन– *veruga* (= शृंखला), लॅटिन– *urvum* (= बद्ध) हे शब्द त्याच यूरोभारतीय धातूपासून साधलेले आहेत. 'वरुण' हा शब्द *ụeru–n–os* (म्हणजे बांधणारा, बंधनांत ठेवणारा) या यूरोभारतीय रूपाशीं सदृश आहे. वरुणाचे 'पाश'– किंबहुना वरुणाशीं संबद्ध असलेल्या सर्व कल्पना– या व्युत्पत्तीस पुष्टीच देतात. वरुण आपल्या मायेच्या योगें अखिल विश्वाचें प्रवर्तन आणि नियमन करतो. तें करण्याची त्याची पद्धति म्हणजे निरनिराळ्या निसर्गशक्तींना एक प्रकारच्या बंधनांत ठेवणें हीच आहे. वरुणाचे पाश म्हणजे या प्रचंड विश्वांतील वेगवेगळ्या शक्तींना बांधून ठेवणारें एक जादूचें जाळेंच आहे. अशी कल्पना सुचणें ही प्राचीन वैदिक कवींच्या बाबतींत अगदी क्रमप्राप्त अशीच गोष्ट आहे! ऋग्वेदांत ही कल्पना अनेक ठिकाणीं निरनिराळ्या रीतींनी सुचविली आहे. उदाहरणार्थ :

नव्यंनव्यं तन्तुमा तन्वते दिवि
समुद्रे अन्तः कवयः सुदीतयः । (१.१५९.४)
स इत् तन्तुं स वि जानात्योतुम् ।(६.९.२).[७]

ऋग्वेदांत वरुणाच्या–आणि कधीकधी मित्राच्या–संबंधांत उपयोजिलेले धातु, युक्ति, योग, यातर, वयस, वयुन, इत्यादि शब्द याच

(७) या संदर्भांत पुढील वैदिक उल्लेखहि अतिशय उद्बोधक वाटतील. १.१२०.२, ३.३.६, ५.१०.२, ८.४२.२०, १०.०५.२, १०.८२.१; १०.१२९.५; अथर्व. १०.८.३७, १३ १ ६.

जादूच्या जाळ्यास उद्देशून उपयोजिले आहेत. अशा पाशांच्या शिवाय–किंवा जादूच्या जाळ्याशिवाय–या प्रचंड निसर्गशक्तींचें नियमन करणें वरुणास शक्य झालें नसतें. एकदा हीं पाशांची कल्पना वैदिक कवींच्या मनांत बद्धमूल झाल्याबरोबर त्या कल्पनेचा अतिदेश करणें त्यांना सहजसाध्य होतें. आणि त्यांनीं या कल्पनेचा केलेला अतिदेश बऱ्याच अंशीं सयुक्तिक असाच वाटतो. वरुण हा प्रचंड विश्वाचा नियन्ता–म्हणजे हें प्रचंड विश्व ज्या ऋताच्या, वैश्विक धर्माच्या, अनुरोधानें चालतें त्या ऋताचा रक्षणकर्ता! मानवी नीतिनियमांचें धारण आणि रक्षण करणें हेंहि या विश्वसम्राटाचेंच काम !! तेव्हा या वैश्विक ऋतास किंवा मानवी नीतिनियमांस विरोध करणाऱ्या पाप्यांस शासन करण्याचा प्रसंग वरुणावर कधींकधीं येणारच. अशा वेळीं तें शासन तो आपल्या पाशांनीच करतो. वरुणाच्या पाशांच्या कल्पनेंत हे दोन विचारप्रवाह समाविष्ट झालेले आहेत. आपल्या पाशांच्या योगानें निसर्गशक्तींना बन्धनांत ठेवून 'बन्धक' वरुण त्यांचें योग्य असें प्रवर्तन आणि नियमन करतो–आपल्या मायेचा प्रभाव त्यांच्यावर गाजवितो ! आणि आपण घालून दिलेल्या धर्मांचें किंवा नियमांचें जर कोणी उल्लंघन केलें तर त्यांस शासन करतो–तेंहि आपल्या पाशांनीच !!

या ठिकाणीं 'ऋत' या शब्दाचें आणि त्या शब्दास आधारभूत असलेल्या कल्पनेचें चिकित्सापूर्ण विश्लेषण केलें तर तेंहि या सर्व प्रश्नावर मोठा प्रकाश पाडूं शकेल. ब्रुग्मानने 'ऋत' या शब्दाची भाषाशास्त्रदृष्ट्या प्रथम चिकित्सा केली.[८] त्याच्या मतें ग्रीक–*eirenē* (किंवा *iranā*) हा द्वित्वात्मक शब्द युरोभारतीय *ar (='बांधणें', 'जोडणें', 'एकत्र आणणें') या धातूपासून साधलेला आहे. या ग्रीक शब्दाचा अर्थ 'पवित्र बन्धन', 'धार्मिक बन्धन' असा आहे. *ar या युरोभारतीय धातूपासून सिद्ध झालेले दुसरेहि कित्येक शब्द इतर

(८) Brugmann. "Eirene." *BSGW* 1916.

ठेवणारा ), वरुण (=बन्धनात ठेवणारा ), ऋत ( = विश्वव्यापी बन्धन ), आदित्य ( = बन्धनात न पडलेले ), अदिति ( = बन्धनहीनता )—हे सर्व शब्द एकाच विशिष्ट कल्पनेस पुष्टि देणारे आहेत आणि म्हणूनच वैदिक देवतामंडलात त्यांचा एक विशिष्ट सुसघटित असा गट कल्पिलेला आहे वरुण मित्र-अधिष्ठित अशा या देवतांच्या समूहाची कल्पनाहि फार प्राचीन असली पाहिजे कारण खिस्तपूर्व १४ व्या शतकातील बोगझकाय येथील मृण्मुद्रेवरहि, 'आपल्या समूहासह मित्र', 'आपल्या समूहासह वरुण' असेंच या दोन देवतांचें आवाहन केलेलें आहे [१२]

सम्राट् वरुणाचें अखिल विश्वावरील अधिराज्य हें अशा प्रकारचें आहे. त्या अधिराजाचे निरनिराळे प्रमुख विशेष वैदिक कवींनी 'असुर', 'माया', 'ऋत', 'मित्र', 'आदित्य', 'अदिति' या शब्दांनी सूचित केले आहेत वरुण हा विश्वसम्राट् आहे असें एकदा मानलें की त्याच्या वर्णनात एखाद्या पौरस्त्य बादशहाच्या गौरवास अनुरूप अशा सर्व गोष्टींचा उल्लेख वैदिक कवींनी करावा हें क्रमप्राप्तच होत वरुण हिरण्मय द्रापि (armour) धारण करून त्यावर तेजस्वी झगा पांघरतो, त्याच्या भोवती त्याचे दूत व हेर बसलेले असतात, त्याचें 'क्षत्र' सर्वोत्कृष्ट आहे, त्याच्या व्रतांचें—आज्ञांचें—उल्लंघन कोणीहि करू शकत नाही, तोच खरा 'धृतव्रत' आहे—इत्यादि वर्णनांनी विश्वसम्राटाचें शब्दचित्र परिपूर्ण होतें। वरुणाने

(१२) आपल्या देवताभण्डलातील सर्वश्रेष्ठ देवाचें वर्णन 'बन्धनकर्ता' या शब्दाने जसें वैदिक कवींनी केलें आहे तसेंच इतर देशातील प्राचीन कवींनीहि केलेलें आढळतें आयर्लंडच्या प्राचीन लोकांचा देव *Bond*, माकीयनांचा देव *Darzales*, थ्रिगियनांची देवता *Bendis*, या सर्वांना आधारभूत अशी कल्पना बन्धनाचीच आहे पहा GUNTERT उ. ग्र., १५४.

मानवी नीतिधर्मांचें परिपालन करणें हा त्याने करावयाच्या वैश्विक ऋताच्या परिपालनाचाच एक भाग आहे.[१३]

वरुणाचा अधिकार साहजिकपणेंच सर्वसमावेशक आहे. आणि म्हणूनच निरनिराळ्या दृष्टींनी श्रेष्ठ असलेल्या सोमयमादि देवतांचें वरुणाशीं सादृश्य असल्याचें वेदांत सूचित केलें आहे. या बाबतींत एका गोष्टीचा पुनरुच्चार करणें अत्यावश्यक आहे. या देवतांपैकीं कोणाशींहि वरुणाचें पूर्णपणें तादात्म्य असल्याचें दाखवितां येणार नाही. वरुणांत त्या सर्वांचा समावेश होतो, आणि म्हणून तो स्वतः सर्वांच्या अपेक्षेने श्रेष्ठ ठरतो![१४]

या प्रचंड आणि तेजस्वी विश्वाचा प्रवर्तक आणि नियन्ता या नात्याने वरुणाकडे पाहूं लागलें तर त्यास उद्देशून गायिलेल्या सूक्तांची

(१३) थोडेसें विषयांतर करून या ठिकाणीं हें सांगावयास हरकत नाहीं कीं वरुणाच्या या सम्राट्स्वरूपावरून वेदकालीन राजत्वाच्या कल्पनेवर बराचसा प्रकाश पडण्यासारखा आहे. योहान्सनच्या मतें वैदिक कवींनी वरुणाच्या रूपाने आपल्या राजत्वाच्या कल्पनेस आकार केलें आहे. पण याच्याच बरोबर दुसरीहि एक गोष्ट सांगणें अवश्य आहे. ती ही : 'वरुण' हा शब्द 'वृ' (= निवड करणें, पसंत करणें) या धातूपासून व्युत्पादून, त्या व्युत्पत्तीच्या आधारें, वरुण म्हणजे दिव्याचा राजा हा 'निवडलेला' 'पसंत केलेला' होता–अर्थात् वेदकालीन लोकहि सामान्यपणें आपला राजा निवडून असले पाहिजेत, त्या काळीं स्वतंत्र elective monarchy असली पाहिजे, असें अनुमान करणें धोक्याचें आहे. या संदर्भात पहा : अथर्व. ३·४. WINTERNITZ. *HIL* I, 146.

(१४) सामान्यतः सूर्यदेवता म्हणून समजला गेलेला वैदिक देव सविता हाहि मुळांत वरुणाचेंच एक विशिष्ट स्वरूप दर्शवितो हें तद्विषयक वैदिक उल्लेखांवरून सिद्ध करतां येण्यासारखें आहे (पहा : DANDEKAR. "New Light on the Vedic God, Savitr". *ABORI* XX, 293 ff.)

मित्र आणि वरुण यांच्या परस्परसंबंधाविषयी एक सयुक्तिक उपपत्ति पुढे मांडतां येण्यासारखी आहे. बन्धन हें दोन प्रकारचें असूं शकतें—एक मित्रत्वाचें आणि दुसरें शासकत्वाचें. पहिल्या प्रकारचें बन्धन हें सामान्यत: समान दर्जाच्या व गुणांच्या व्यक्तींमध्ये निर्माण होतें, तर दुसऱ्या प्रकारच्या बन्धनांत बन्धनकर्त्याचें बद्धांवरील श्रेष्ठत्व स्पष्टपणें सुचविलेलें असतें. म्हणून आपणांस असें म्हणता येणें शक्य आहे कीं, प्रथमत: जरी 'बन्धनकर्त्री' अशी एकच देवता अस्तित्वांत असली पाहिजे, तरी जेव्हा त्या देवतेचीं, मित्र आणि वरुण अशीं, दोन भिन्न स्वरूपें कल्पिलीं गेलीं, तेव्हा साहजिकपणेंच बन्धनाच्या उपर्युक्त दोन प्रकारांपैकी एकेकाशीं त्या दोन देवतांपैकी एकेकीचा विशेष संबंध असल्याचें मानण्यांत आलें. मित्रत्वाच्या बन्धनाचीं जीं निरनिराळीं स्वरूपें—म्हणजेच 'तह,' 'करार,' 'सलोखा' इत्यादि—त्यांवर मित्राचें आध्यक्ष्य असे, आणि प्रवर्तन—नियमनादि जीं शासकत्वाचीं वैश्विक बंधनें समजलीं जात त्यांवर वरुणाचें अधिराज्य असे. मित्रत्वाच्या बन्धनापेक्षा शासकत्वाच्या बन्धनासाठींच पाशाची आवश्यकता अधिक असते. ग्युन्टर्ट या प्रख्यात जर्मन पंडिताने या बाबतींत पुढे असें सुचविलें आहे की "मित्र हा मानवा-मानवांत, किंवा क्वचित्प्रसंगीं (४·४४·५) देव-मानवांत मित्रत्वाचें बन्धन निर्माण करून त्यांच्या जीवनांत सुसघटितपणा-व्यवस्था-प्रस्थापित करतो."[१५] थोडक्यांत म्हणजे, मित्र हा मानवी नीतीचा शास्ता आहे. याच्या उलट, वरुणाचें बन्धन सर्वसमावेशक आहे-विश्वव्यापी आहे त्याच्या शासनांत किंवा ऋतांत इतर सर्व शासनाचा किंवा नीतिधर्माचा अन्तर्भाव होतो. बन्धनाचा human aspect जो असतो त्याची देवता मित्र, आणि cosmic aspect जो असतो त्याची देवता वरुण! आणखीहि एक अतिशय सूचक अशी गोष्ट येथे लक्षांत घेण्यासारखी आहे वैदिक उल्लेखांवरून असें दिसतें की, मित्राधिष्ठित धर्माचें उल्लंघन

(१५) GÜNTERT. उ. पृ., १२३-

करीत असता मानवाला आपल्या त्या प्रमादाची जाणीव असते. कारण, प्रत्यक्ष संबंधामुळे मित्राच्या बन्धनाविषयी तो सामान्यपणें सारखा जागरूक असतो. याच्या उलट, वरुणविहित निश्वव्यापी ऋत अशा सूक्ष्म रीतीनें आपलें कार्य करीत असतें की तें मानवाच्या बुद्धीला अगम्य राहतें; आणि त्यामुळे त्याला न कळत–'अचित्ती'–त्याच्या हातून त्या ऋताचें उल्लंघन होतें (५.८५.८, ७.८६.६; ७.८९.५). याविषयी एवढा विस्तार केल्यानंतरहि असें सांगणें अवश्य आहे की वरुण आणि मित्र या दोहोंमधील विरोध ऋग्वेदांत केवळ परोक्षतया सुचविला आहे–त्यावर प्रत्यक्षपणें भर कधीच दिलेला दिसत नाही. सर्व पाहिलें असतां, वरुणाच्या मानानें मित्र हा अगदींच मागे पडलेला आहे, आणि ऋग्वेदांत 'आदित्यांपैकीं एक' एवढेंच त्याचें व्यक्तिमत्त्व प्रतीत होण्यासारखें आहे. आतापर्यंत वर्णन केलेल्या वैदिक धर्माच्या या स्वरूपाचा–बन्धनकल्पनाविहित दैवतशास्त्राचा–वरुणाचेंच वर्चस्व स्पष्टतया आहेत. त्यांतील मित्राचें स्थान निश्चितपणें दुय्यम दर्जाचें आहे मात्र नंतरच्या वैदिक यागविषयक वाङ्मयांत, मुख्यतः वेदांत अगदी अल्प प्रमाणांत मानल्या गेल्या मित्र आणि वरुण यांच्यांतील विरोधाचा अगदींच निराळ्या रीतीनें विकास झाला आहे. आणि त्या विरोधावर मूळाशीं सर्वस्वीं विसंगत असा भर दिला गेलेला आहे. आणि, मागे पाहिल्याप्रमाणे, हीच गोष्ट वरुण आणि मित्र या देवतांच्या मूळच्या व्यक्तिमत्त्वासंबंधी व स्वभावधर्मासंबंधी बराचसा गैरसमज निर्माण करण्यास कारणीभूत झालेली आहे!

याच्या उलट, इन्द्र आणि वरुण या दोघांमधील विरोध मात्र वैदिक दैवतशास्त्राचा एक प्रमुख विशेष म्हणून मानावयास पाहिजे या विरोधासंबंधी अतिशय सूचक असें सूक्त म्हणजे चवथ्या मंडलांतील वेचाळीसावें सूक्त! या सूक्तास 'इन्द्र–वरुण–संघर्ष–संवाद' असा मथळा द्यावयास कांहींच हरकत नाही. इन्द्र आणि वरुण या दोन प्रमुख

वैदिक देवतांमधील विरोधाची पार्श्वभूमि सम्यक्तया समजण्यासाठी वैदिक देवतशास्त्रांतील मध्यवर्ती विचारप्रणालीचा विकास कसा झाला हें स्थूलपणें पाहणें उपयुक्त ठरेल.

या विचारविकासांतील पहिल्या तीन अवस्था आपल्या विवेचनाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाच्या आहेत. (१) वैदिक मानवाच्या–किंबहुना, सर्वसामान्यपणें प्राचीन मानवाच्या–मनावर प्रथमत: सर्वांत मोठा प्रभाव कशाचा पडला असेल तर तो या सृष्टीच्या भव्यतेचा, प्रचंडतेचा, प्रभूततेचा, आणि तेजस्वितेचा. या प्रभावाचाच परिणाम वैदिक कवींनी या अखिल विश्वालाच देवतास्वरूप देण्यांत झाला असावा. भव्य, प्रचंड, प्रभूत, आणि तेजस्वी अशा विश्वाचें वैदिक कवींनी देवस्वरूप चित्रीकरण केलें तें 'द्यौः पितर' (Jupiter) या देवतेच्या द्वारा. (२) यापुढची अवस्था तर अखिल मानवीविचारेतिहासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची आहे. प्राचीन मानवाला–तसेंच, प्राचीन वैदिक कवींना–लवकरच असें समजून आलें की, हें भव्य, प्रचंड, प्रभूत, आणि तेजस्वी विश्व म्हणजे एखादी संकरात्मक–chaotic–घटना नाहीं. या विश्वाच्या प्रवर्तनास आणि नियमनास आधारभूत असा एक धर्म–एक 'कायदा–अस्तित्वांत असला पाहिजे; आणि त्या कायद्याची अंमलबजावणी एखादा मायी विश्वसम्राट् करीत असला पाहिजे. त्यामुळेच या विश्वांत मानवी बुद्धीला आश्चर्यजनक–व म्हणून यातुप्रधान वाटणारी–सुसंघटितता आणि व्यवस्था नांदत असली पाहिजे वैदिक देवतशास्त्रांतील अत्यंत भव्य अशा वरुण-ऋतकल्पनेचा उद्भव या अवस्थेतच झाला (३) आतापर्यंत वैदिक मानव हा सर्वसामान्य प्राचीन मानवांप्रमाणे बाहेरील विश्वाशीं –निसर्गाशीं–अधिक निकट असा होता. त्याने आपल्यांत आणि निसर्गांत भेदभाव मानला नाहीं विश्वव्यापी रसात्मक यातुशक्तीच्या योगाने–'असु' च्या योगाने–देव, मानव, आणि निसर्ग हे सारत: एकाच प्रकारचे असल्याची यातुप्रधान भावना त्याच्या मनांत वास करीत होती. परंतु लवकरच वैदिक मानवाला 'मानव'

म्हणून स्वतःची अन्यव्यतिरेकी जाणीव विशेषप्रकारें झाली असावी. आणि ती जाणीव होण्याचें कारण म्हणजे त्याच्या प्रगतीस होणारा आणि उत्कटत्वाने त्याला तोंड द्यावें लागणारा अन्य मानवांचा विरोध हेंच असलें पाहिजे. या नवीन परिस्थितींत, वैदिक मानवाने आपल्यास अनुरूप व इष्ट असा नवा देव निर्माण केला. तो म्हणजे 'वृत्रहा'—वृत्राचा म्हणजे विरोधाचा नाश करणारा—आणि आपल्या आर्य अनुयायांना विजयांवर विजय मिळवून देणारा इन्द्र हा होय. वैदिक मानवाच्या आपणांस ज्ञात अशा जीवनांतील फार मोठा भाग या अवस्थेंतील आहे हें ऋग्वेदांत इन्द्रास दिलेल्या प्राधान्यावरून सहज समजून येण्यासारखें आहे. इन्द्र हीच विजिगीषु वैदिक आर्यांची खरी राष्ट्रीय देवता! या देवतेने मागील अवस्थेंतील प्रमुख देवताच्या वर मात केली. ऋग्वेद हें संपूर्ण वैदिक जीवनाचें संपूर्ण चित्र देणारें वाङ्मय नाही हें सांगावयास नकोच. ऋग्वेदांत मुख्यतः विजिगीषु, महत्त्वाकांक्षी, भौतिकवादी, सुख व समृद्धि यासाठी झटणाऱ्या वैदिक आर्यांच्या जीवनाचें प्रतिबिंब अधिक मोठ्या प्रमाणांत पडलें आहे. ऋग्वेदाचें देवतशास्त्र हें अगदी स्पष्टपणें इन्द्रप्रधान आहे. परंतु इन्द्राच्या पूर्वी प्रधानभूत असलेली देवतशास्त्रीय कल्पना आणि नंतर महत्त्व पावू लागलेल्या देवतशास्त्रीय कल्पना कोणत्या असल्या पाहिजेत, हें ऋग्वेदाच्या खोल, चिकित्सापूर्वक अभ्यासावरून कळण्यासारखें आहे. वरुणप्रधान देवतशास्त्राकडून इन्द्रप्रधान देवतशास्त्राचें निर्माण झालेलें वर्चस्व हें वर वर्णिलेल्या देवतशास्त्रीय विचारविकासाच्या प्रणालीस धरूनच आहे. वरुण आणि इन्द्र या दोहोंमधील विरोधाच्या उद्भवाचा इतिहास हा असा आहे.

ऋग्वेदांतील चवथ्या मण्डलांतील बेचाळिसावें सूक्त म्हणजे इन्द्र-वरुण विरोधेतिहासाचें प्रमुख दाखलेवजा साधन समजलें पाहिजे. प्राचीन आर्यांच्या देवतशास्त्रांत सर्वोच्च दिव्यस्थान देऊन गौरविलेल्या वरुण-देवतेस वैदिक भारतीयांच्या देवतशास्त्रांतील राष्ट्रीय रणदेवता जो इन्द्र

तिने जवळजवळ स्थानभ्रष्ट कसें केलें याचा कविकल्पनेने वर्णिलेला वृत्तान्त या सूक्तांत आहे. मागील वाक्यांत, 'प्राचीन आर्य' आणि 'वैदिक भारतीय' असे शब्दप्रयोग मी हेतुपुरःसर केलेले आहेत हें आतापर्यंतचें विवेचन लक्षपूर्वक ऐकणाऱ्या श्रोत्यांच्या निदर्शनास सहज आलें असेल. मुख्यतः भारतीयांच्या विचारविकासांत जुनी वैदिक वरुणाधिष्ठित दैवतशास्त्रीय कल्पना मागे पडून नवी इन्द्राधिष्ठित दैवतशास्त्रीय कल्पना पुढे आली. वैदिक दैवतशास्त्रांत हा बदल घडून आला, परंतु अवेस्तांत मात्र पूर्वीप्रमाणेच अहुर मज्दाचें वर्चस्व कायम राहिलें. या घटनेचीहि ऐतिहासिक कारणें सांगतां येतील. त्यापैकी एक म्हणजे वैदिक इन्द्राचा कोणीच प्रतियोगी–जो अहुर मज्दाला परिणामकारक रीतीनें विरोध करूं शकला असता–असा अवेस्तांत निर्माण झाला नाहीं. ऋग्वेदावरून तर असें दिसून येतें की वैदिक कालींहि कांहीं वैदिक आर्यांनी वरुणाधिष्ठित दैवतशास्त्रीय कल्पनाच साक्षेपाने उचलून धरली, आणि तिचा गौरव केला. अशा वैदिक आर्यांत वासिष्ठांचा प्रामुख्याने उल्लेख करावयास पाहिजे. ऋग्वेदाच्या सूक्ष्म अभ्यासानें आणखी असेंहि प्रत्ययास येतें की इन्द्र आणि वरुण या दोन देवतांमध्ये नैसर्गिकपणेंच निर्माण झालेला विरोध शक्य तितका नाहींसा करून त्यांच्यामध्ये समेट घडवून आणावयाचा प्रयत्न कांहीं वैदिक कवींनी – विशेषतः सातव्या मण्डलांत वासिष्ठांनी–केलेला आहे.

वृत्राण्यन्यः संमिथेषु जिघ्नते
व्रतान्यन्यो अभि रक्षते सदा । (७.८३.९)

यासारख्या वैदिक उल्लेखांवरून ही गोष्ट अगदी स्पष्ट होईल. इन्द्र हा 'जेता' खरा, पण जित लोकांचा 'नियन्ता' किंवा 'शास्ता' वरुणच ! Indra conquers and Varuna rules या सूत्रमय इंग्रजी वाक्यावरून या सहकारयुक्त समेटाचा भावार्थ पूर्णपणे ध्यानांत येईल. अशा रीतीने इन्द्र आणि वरुण या दोघांच्या व्यक्तिमत्त्वांतील सारभूत

संबंध असल्याचें वेदांत ठिकठिकाणीं विशेषत्वाने सुचविण्यांत आलें आहे (२.२८.४, ३८८, ५८५ ३; ८५६; ७८७ १; ८.४१.२, १०.७५.२; अथर्व ७.८३.१) ही पहिली गोष्ट. वैदिक विश्वविज्ञानशास्त्रांत (Vedic cosmography) 'वरचा' आकाशांतील समुद्र आणि 'खालचा' पृथ्वीवरील समुद्र अशा दोन समुद्रांची कल्पना प्रामुख्याने अस्तित्वांत होती, व विश्वसम्राट् वरुण आपलें विश्वनियमनाचें काम या आकाशस्थ समुद्रांत राहून करतो (१.२५.१०) अशी कांहीं वैदिक कवींची कल्पना होती ही दुसरी गोष्ट. आणि मायी वरुण हा सर्व अद्भुतांचा स्वामी असून समुद्र हा सर्व अद्भुतांचें आगर आहे असा लोकांत सर्वदूर पसरलेला समज ही तिसरी गोष्ट[16]

---

(१६) या बाबतींत केशमर या पंडिताने आणखी एक उपपत्ति पुढे मांडली आहे. वरुणाचा शेवटीं समुद्राशींच संबंध दृढ करण्यांत आला या वैचारिक घटनेस एक भाषाशास्त्रीय घटना कारणीभूत झाली असण्याचा संभव आहे असें केशमरने म्हटलें आहे (WZKM 33, pp. 1 ff) हित्ताइट भाषेंतील *aruna* हा शब्द उच्चारसादृश्याच्या दृष्टीने वैदिक 'वरुण' या शब्दाशीं, विशेषतः त्या शब्दाचें जें रूप बोगझकोय येथे सांपडलेल्या लेखांत दिसतें त्या रूपाशीं, निकटचें संबद्ध आहे. आणि तोच *aruna* शब्द संस्कृतमधील 'अर्ण,' 'अर्णव' (= समुद्र) या शब्दांशीं अर्थदृष्ट्या संबद्ध आहे. 'वरुण' आणि 'वर' या शब्दांच्या भाषाशास्त्रीय संबंधाविषयीं निरनिराळ्या पंडितांनी सुचविलेली [illegible] या संदर्भांत विचारार्ह आहे

# परिशिष्ट

## व्याख्यान दुसर

### 'असुर' वरुण (१)

ऋ. १.२४.१४ : हे सर्वज्ञ असुरा, आमच्यासाठीं येथें वास करून, हे राजन्, आम्ही केलेल्या पापांचे पाश मोकळे कर.

ऋ. २.२७.१० : हे असुर वरुण, तूंच सर्वांचा—देव आणि मर्त्य या सर्वांचा—अधिराजा आहेस.

ऋ. २.२८.७ : हे असुर वरुण, पाप करणाऱ्यास जीं मारक शस्त्रें तुझ्या प्रेरणेने, खंडित करतात त्यीं शस्त्रांनी आम्हांस (मारूं) नको.

ऋ. ८.४२.१ : सर्व धनाचा स्वामी अशा असुरानें आकाशास सावरून धरलें आहे. त्यानेंच विस्तीर्ण पृथ्वीस निर्माण करून तिचें व्यवस्थापन केलें.

ऋ. १.१५९.४ : त्या मायी सर्वज्ञांनी (द्यावापृथिवीस) निर्माण करून त्यांचें व्यवस्थापन केलें.

ऋ. ३.३८.७ : निरनिराळ्या प्रकारची असुरशक्ति धारण करणाऱ्या मायाव्यांनी त्यांत (नवीन) रूप निर्माण केलें.

(या ऋचेचा संदर्भ नीटसा समजण्यासारखा नाहीं)

ऋ. ५.८३.२ : त्याच्या मायेच्या योगें मायाव्यांनी निर्मिति केली.

ऋ. १.२४.१० : उच्च स्थानीं स्थापिलेलीं जीं हीं नक्षत्रें तीं रात्रीं दिसतात, परंतु तीं दिवसा कोठें जातात? वरुणानें घालून दिलेले नियम अनुल्लंघनीय आहेत (उदाहरणार्थ,) सुप्रकाशित होऊन (नियमानुसार) चन्द्र रात्रीं येतो.

गुण कायम ठेवूनहि ते एकमेकांस पूरक होऊं शकतात हेंच समेटवादी वैदिक कवींनी सुचविलें आहे. अर्थात् यामुळे वरुणाच्या मूळच्या व्यक्तिमत्त्वांत वैश्विकतेस जें प्राधान्य होतें तें मात्र पुष्कळच कमी झालेलें आहे.

वरुण आणि इन्द्र यांच्या परस्परसंबंधाच्या तीन अवस्था ऋग्वेदांत दृष्टीस पडतात. पहिली म्हणजे प्राचीन आर्यांच्या मतानुसार असुर वरुणाचें सर्व विश्वावर अधिराज्य असल्यामुळे त्याचें सर्व देवांवरील–इन्द्रासह सर्व देवांवरील–अनाधृष्य श्रेष्ठत्व! ही अवस्था ऋग्वेदाच्या कांहीं भागांत–आणि प्रकर्षानें अवेस्तांत–दृष्टीस पडते. दुसरी अवस्था म्हणजे विजिगीषु वैदिक आर्यांनी आपल्या महत्त्वाकांक्षेस आणि युयुत्सु वृत्तीस अनुसरून इन्द्राचें वर्चस्व मान्य केलें, आणि त्यास आपली राष्ट्रीय देवता बनविलें. यामुळे जुन्या वरुणाधिष्ठित आणि नव्या इन्द्राधिष्ठित देवतशास्त्रीय कल्पनांमध्ये विरोध निर्माण होऊन इन्द्राचें वर्चस्व सुप्रतिष्ठित झालें. 'असुर' वरुण आणि 'वृत्रहा' इन्द्र यांच्यांतील विरोध हा ऋग्वेदाच्या बऱ्याच मोठ्या भागाचा स्थायीभाव समजला पाहिजे. आणि तिसरी अवस्था अशी की त्यावेळीं वरुण-पंथ आणि इन्द्र-पंथ — Varuna-cult आणि Indra-cult — यामध्ये समेट किंवा सहकारभावना निर्माण करण्याचा प्रयत्न केला गेला.

'असुर' वरुण आणि 'वृत्रहा' इन्द्र यांमधील विरोधास देवतशास्त्रीय कल्पनेच्या नैसर्गिक विकासाचा आधार आहे हें मागे सांगितलेंच आहे. हा विरोध अधिकाधिक दृढ होण्यास दुसरी एक गोष्ट–एक ऐतिहासिक घटना–कारणीभूत झाली असण्याचा संभव आहे. आपला प्रगतिपूर्ण मार्ग आक्रमत असतां विजिगीषु आर्यांना असीरियन लोकांनी विरोध केला असणें ऐतिहासिक दृष्ट्या अगदी शक्य आहे. त्या असीरियनांचें — 'असुरां'चें — पारिपत्य आर्यांनी केलें या ऐतिहासिक घटनेचें देवतशास्त्रीय स्वरूप म्हणजेच इन्द्रानें 'असुर' वरुणाचें वर्चस्व कमी केलें

हें होय. मूळच्या परस्परभिन्न असलेल्या दोन कल्पनांचें मिश्रण झालें म्हणजे त्याची परिणति कशी अनपेक्षित होते हें या संदर्भात पाहण्यासारखें आहे. आणि हें सर्व घडलें असलें पाहिजे तें एका लौकिक व्युत्पत्तीच्या (folk-etymology) आधारावर! उच्चारसादृश्यामुळे असुर आणि असीरियन हे एकच अशी सामान्य वैदिक आर्यांची समजूत झाली असल्यास त्यांत नवल नाहीं!!

वेदोत्तर हिंदु दैवतशास्त्रांत वरुणाच्या स्वरूपांत जो बदल झालेला दिसून येतो त्याचें बीज इन्द्रदेवतेने वरुणदेवतेचें विश्वव्यापी माहात्म्य कमी केलें या घटनेंतच आहे. इन्द्राचा गौरव जसजसा वाढूं लागला तसतसा वरुणाचा कमी होऊं लागला. पण वरुणकल्पनेंतील जो मध्यवर्ती विचार होता त्याचा अगदीं निराळ्या रीतीनें पुढें विकास झालेला आहे. प्राचीन भारतीयांचे अनेक तत्त्वज्ञानात्मक सिद्धान्त त्यांच्या दैवतशास्त्रीय कल्पनांतूनच उद्भूत झालेले आहेत. औपनिषद ब्रह्मविषयक सिद्धान्ताचें चिकित्सापूर्ण विश्लेषण करणाऱ्या अभ्यासकास तो सिद्धान्त म्हणजे वरुणाधिष्ठित दैवतशास्त्रीय कल्पनेचा एक प्रकारचा नैसर्गिक विकास आहे असें आढळून येईल. मुक्ति मोक्ष यांच्याविषयींच्या वेदान्तांतील कल्पनांचें वरुणाच्या पाशांसंबंधींच्या कल्पनांशीं फारसें दूरचें नातें नाहीं असेंहि त्याच्या निदर्शनास येईल. वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाचें सार या रीतीनें तत्त्वज्ञानात्मक स्वरूपांत परिणत झालेलें आहे. दैवतशास्त्रीय विकासाच्या दृष्टीनें मात्र इन्द्राच्या उत्कर्षानंतर वरुणाचें विश्वव्यापी अधिराज्य संपुष्टांत आलें. या विश्वांतील निरनिराळ्या विभागांवर निरनिराळ्या देवतांचें स्वामित्व प्रस्थापित झालें, आणि त्यांतील केवळ एका विभागाचा म्हणजे समुद्राचा अधिपति म्हणून वरुणास मान्यता देण्यांत आली. विश्वसम्राट् वरुणास, विश्वांतील अनेक विभागांपैकीं समुद्राचाच—जलाचाच—अधिपति समजण्यांत आलें.

भारतीयांच्या दैवतशास्त्रीय विचारविकासांतील या घटनेस बहुंशीं तीन गोष्टी कारणीभूत झाल्या असाव्यात. वरुणाचा जलाशीं निकटचा

ऋ ५६३३ नानावर्ण मेघाच्या योगें तुम्ही (दोघे) गर्जना निर्माण करता आणि असुराच्या मायेच्या योगें आकाशातून वृष्टि करविता

ऋ ७८७४ ज्ञान प्राप्त झालेल्या मला वरुणाने सांगितलें की अघ्न्या (धेनु) एकवीस नावें धारण करते (तिच्या) स्थानाचीं रहस्यें (ज्ञात असूनहि) तो सर्वज्ञ (वरुण) तीं सांगत नाही, (कारण) विद्वान् वरुणास तीं पुढील पिढीस शिकवावयाचीं आहेत

(ही ऋचा सामान्यपणें अस्पष्टार्थ जरी असली तरी ती 'असुर' वरुणाच्या यातुशक्तीची चांगली निदर्शक आहे)

ऋ ११५९४ त तेजस्वी विद्वान् आकाशात—(म्हणजेच जणू) समुद्राच्या अन्तराळात—नव्या नव्या तन्तूचें जाळें विणतात

ऋ ६९.३ तो आढवे उभे, (दोन्ही प्रकारच), धागे जाणतो

ऋ ११३-२ रुद्र (अशा सूर्या) साठी अधिक रुंद असा रस्ता (निर्माण झाला असल्याचें) दिसलें ऋताचा मार्ग तजस्तन्तूनी (एकत्र) धारण केला गेला आहे ...

ऋ ७८३९ एकजण (इन्द्र) युद्धात वृत्राचा (शत्रूचा) निःपात करतो, तर दुसरा (वरुण) नेहमी धर्मनियमाच पालन करता.

# वैदिक देवतांचें अभिनवदर्शन

## व्याख्यान तिसरें

### 'वृत्रहा' इन्द्र

वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाचें चिकित्सापूर्ण विश्लेषण करून जितक्या विस्तारपूर्वक मीं त्या देवतेविषयीं विवेचन केलें तितक्या विस्तारपूर्वक विवेचन मी इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वाविषयीं करणार नाहीं खर पाहिलें असता इतक्या तपशीलवारपणानें इन्द्रदेवतेविषयीं विचार करण्याची आवश्यकताहि नाहीं इन्द्र ही वैदिक देवतशास्त्रातील महत्त्वाची देवता नाही म्हणून मी असें म्हणतों असें मात्र कृपा करून समज नये ! ( किंवा मी स्वत वासिष्ठगोत्रोत्पन्न असल्यामुळे साहजिकपणेंच वरुणदेवतेचा पक्षपाती असलों पाहिजे, आणि म्हणून मी असें म्हणतों असेंहि कृपा करून समज नये !! ) मीं अगोदरच सांगितलें आहे की, ऋग्वेदीय देवतशास्त्र हें संपूर्णतया इन्द्रप्रधान असें देवतशास्त्र आहे अधिकृत – official – वैदिक देवतशास्त्राचें इन्द्र हेंच खरेंखुरें प्रतीक आहे आणि म्हणूनच ऋग्वेदाचा जवळजवळ एक चतुर्थांश भाग इन्द्रसूक्तांनीं व्यापिलेला आहे इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वाचा विस्तारपूर्वक विचार करावयाची आवश्यकता नाही असें मीं म्हटलें, तें केवळ या व्याख्यानमालेच्या दृष्टीनें – या व्याख्यानमालेच्या द्वारा ज्या विषयाचें प्रतिपादन करणें मला मुख्यत अभिप्रेत आहे त्या विषयाच्या दृष्टीनें. आणि मीं असें म्हणतों याला अनेक कारणें सांगता येतील इन्द्र ही वैदिक देवतशास्त्रातील प्रधान देवता असल्यामुळे त्या देवतेच्या व्यक्ति-मत्त्वाविषयीं प्रभूत वाङ्मय निर्माण झालेलें आहे, आणि तद्द्वारा ती देवता

वेदाभ्यासकास सामान्यतः चांगलीच परिचित झाली आहे. किंबहुना, वैदिक देवतशास्त्रविषयक काही लिखाण पाहिलें तर आपल्याला कधी कधी अशी शंका—न्याय्य शंका—येऊं लागते की, त्या लेखकांनी वैदिक देवतशास्त्र म्हणजे इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वाचें आणि वीरकर्माचें वर्णन असें समीकरण आपल्या मनात बाळगून तर आपलें लिखाण लिहिलें नाही ना! दुसरें असें की वरुणाच्या व्यक्तिमत्त्वाविषयी विश्लेषणपूर्वक आणि चिकित्सापूर्ण विवेचन करण्याचा जो मीं आतापर्यंत प्रयत्न केलेला आहे, त्या प्रयत्नातून इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वासंबंधी विवेचन करण्यास योग्य अशी पार्श्वभूमि अगोदरच तयार झाली आहे असा मला विश्वास वाटतो. कारण माझी वैदिक देवतशास्त्राकडे पाहण्याची दृष्टि काय आहे यासंबंधी माझ्या आतापर्यंतच्या प्रतिपादनात प्रत्यक्ष किंवा परोक्ष असे उल्लेख अनेकदा आलेले आहेत. कुठल्याहि विषयाच्या विवेचनाची पद्धति आणि प्रतिपादनाचा रोख एकदा ठामपणे निश्चित झाला म्हणजे त्या विषया संबंधीच्या आपल्या मूलभूत कल्पना पुढे मांडणें बहुधा सुकर होतें. इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वाचा विचार करताना आपल्याला आता हाच अनुभव येईल. शिवाय, आणखीहि एक गोष्ट या ठिकाणीं आपणास सांगणें मला अवश्य वाटतें. इन्द्रदेवतेसंबंधी जें भरपूर वाङ्मय निर्माण झालेलें आहे असें मीं आपणास सांगितलें त्या वाङ्मयात त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वातील बहुतेक सर्व अंशाचा—किंवा छटांचा—उल्लेख येऊन गेलेलाच आहे. वरुणदेवतेविषयी असें म्हणतां आलें नसतें, आणि म्हणूनच मला त्या विषयाचा विस्तार करावा लागला. तसेंच माझ्या पुढील व्याख्यानांत मी ज्या आणखी एका देवतेच्या व्यक्तिमत्त्वाचा विचार करणार आहे त्या देवतेसंबंधीहि—म्हणजे विष्णुसंबंधीहि—असें म्हणतां येणार नाही. आणि म्हणूनच मला त्या विषयासंबंधीहि थोड्याफार विस्ताराने बोलावें लागणार आहे.

इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वातील बहुतेक सर्व अंश या विषयाच्या आता पर्यंतच्या अभ्यासकांनी विचारात घेतले आहेत ही गोष्ट खरी, पण

त्यांवरून इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वाविषयी त्यांनी काढलेले निष्कर्ष मात्र सर्वस्वी मान्य होण्यासारखे नाहींत. मागें सुचविल्याप्रमाणे, कांहीं विद्वानांनी त्या अंशापैकीं कांहीं अंशांनाच प्राधान्य दिलें, आणि त्यामुळे त्यांनी इन्द्राचें जें व्यक्तिमत्त्व कल्पिलें तें सर्वथैव एकांगी असें झालें. याच्या उलट, दुसऱ्या कांहीं विद्वानांनी इन्द्राचें व्यक्तिमत्त्व प्रथमपासूनच सकुल आणि संकीर्ण स्वरूपाचें असलें पाहिजे असें मत पुढें मांडलें. या बाबतींत मला सिद्ध करावयाचें आहे तें हें कीं इन्द्राचें व्यक्तिमत्त्व हें विकसनशील होतें — Indra's personality was a 'growing' personality. त्याच्या व्यक्तिमत्त्वांत दिसून येणारे निरनिराळे अंश, निरनिराळ्या वेळीं, आणि निरनिराळ्या कारणांमुळे, निर्माण झाले आहेत. वैदिक वाङ्मय आणि इतर ऐतिहासिक साधनें यांच्या सूक्ष्म अभ्यासानें त्या अंशाचें पौर्वापर्य निश्चित करणें शक्य आहे; तसेंच, ते अंश कां निर्माण झाले असावेत याची कारणपरंपरा सयुक्तिक रीतीनें देणें हेंहि शक्य आहे. पण असें करण्यापूर्वी इन्द्रासंबंधीं पूर्वसूरींनी जे सिद्धान्त पुढें मांडले आहेत त्यांची थोडक्यांत परीक्षा करणें हें इष्ट होईल.

वैदिक कवींना आपल्या कल्पनाप्रकर्षानें इन्द्राचें जें शब्दचित्र, ऋग्वेदांत आणि तदितर वैदिक वाङ्मयात, बहुविध रंगांनी रंगविलेलें आहे, त्याची लहानशी प्रतिकृतीहि येथें उमटविण्याची आवश्यकता नाहीं हें मी अगोदरच सांगितलेलें आहे. ऋग्वेदांतील इन्द्रविषयक उल्लेखांचा विश्लेषणपूर्वक अभ्यास केल्यास असें दिसून येतें कीं, एक प्रचंड वैश्विक शक्ति, युयुत्सु वैदिक आर्यांचा विजयी नेता, आणि प्राचीनदैवतशास्त्र-संबद्ध अहि (*dragon*) संहारक वीर अशा त्रिविध स्वरूपांत वैदिक कवींनी मुख्यत. इन्द्राचा गौरव केलेला आहे. हीं तीन रूपें कांहीं ठिकाणीं प्रत्येकीं स्वतन्त्रपणे तर अन्य ठिकाणीं एकत्र अशीं वर्णिलीं आहेत सामान्यतः असें म्हणतां येईल कीं वेदांतील इन्द्रविषयक वर्णनांचा मध्यबिंदु इन्द्राचें वृत्राशीं झालेलें युद्ध आणि त्या युद्धांत इन्द्रास मिळालेला विजय हा आहे. म्हणून इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वाचें सार समजून

घेण्याचा प्रमुख मार्ग म्हणजे त्या देवतेच्या जीवनांतील प्रधानतम अशा घटनेचें – म्हणजे इन्द्र-वृत्र-संघर्षाचें – यथार्थ ज्ञान करून घेणें हाच आहे. आधुनिक वेदाभ्यासकांच्या पहिल्या पिढींतील विद्वानांनी या बाबतींत निरुक्तकार यास्क यांचेंच अनुयायित्व पत्करलेलें दिसतें. “ को वृत्रः” (निरुक्त २।१६) असा प्रश्न उपस्थित करून निरुक्तकारांनी – कदाचित् पूर्वपक्ष म्हणून[1] – ऐतिहासिकांचें याविषयींचें मत सांगितलें आहे की, “ त्वाष्ट्रः असुरः इति ऐतिहासिकाः ”. पण या मतास मान्यता न देतां यास्कांनी नैरुक्तांचें – म्हणजेच आपलें स्वतःचेंहि – असें मत व्यक्त केलें की, “ मेघः इति नैरुक्ताः ”[2]. वृत्र ही एक दैत्यस्वरूप निसर्गशक्ति आहे. ती शक्ति आकाशस्थ जलाचा अवरोध करते, आणि त्यामुळे अत्यंत आवश्यक अशी पर्जन्यवृष्टि होऊं शकत नाहीं. आकाशस्थ जलाचा अवरोध करणारी दैत्यस्वरूप शक्ति म्हणजेच मेघ होय. परंतु या दैत्याचा – वृत्राचा – आपल्या वज्राने निःपात करून इन्द्राने त्या जलाचें विमोचन केलें आणि त्यामुळे पर्जन्यवृष्टि झाली. इन्द्राचें हें वज्र म्हणजे विद्युत्. आणि स्वतः इन्द्र हा पर्जन्याचा – प्रभंजनाचा – तुफानाचा – स्वामी[1] सायणाचार्यांनी आपल्या भाष्यांत इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वा-

(१) यास्कांनी ऐतिहासिकांचें मत नैरुक्तांच्या म्हणजेच आपल्या मतानंतर मांडलें असतें आणि त्यांच्या मताचें खंडन केलें नसतें तरी, निरुक्तांतील वादपद्धति लक्षांत घेतली असतां, ऐतिहासिकांचें मत पूर्वपक्ष म्हणूनच त्यांनी मांडलें असलें पाहिजे असें वाटूं लागतें.

(२) यावरून असें दिसून येतें कीं यास्कांच्या काळींसुद्धा वैदिक-देवताशास्त्रार्थाविष्कारासंबंधीं दोन प्रमुख पंथ प्रचलित होते. एक ऐतिहासिकांचा आणि दुसरा नैरुक्तांचा म्हणजेच निसर्गशक्तिवाद्यांचा. यास्कांच्या निसर्ग-शक्तिवादाचा पगडा आधुनिक वेदज्ञांच्या पहिल्या पिढीवर फार मोठा पडलेला आहे. जातां जातां येथें सांगणें मात्र अवश्य वाटतें कीं निसर्गशक्तिवादी देवताशास्त्रज्ञांनाहि एखादी वैदिक देवता कोणत्या निसर्गशक्तीची द्योतक आहे याविषयीं ऐकमत्य आढळून येत नाहीं.

विषयींचें यास्कप्रणीत मत सरसकट मान्य केलेलें आहे. एवढेंच नव्हे, तर रोट, मॅक्डोनेल, ओल्डेनबेर्ग, पेरी, ब्लूमफील्ड वगैरे पाश्चात्य पंडितांनीहि इन्द्र-वृत्र-संघर्षाचा अन्वयार्थ असाच लावलेला आहे.[३] आणि त्या विद्वानांना आपल्या म्हणण्यास पुष्टिदायक असा भरपूर पुरावाहि दिलेला आहे. इन्द्र आपल्या वज्राने वृत्राचा[४] निःपात करतो त्यावेळीं आकाश आणि पृथ्वी कम्प पावतात ( १.८०.११; २.११.९-१०; ६.१७९ ). या संघर्षाच्या वेळीं वृत्राने जलाचा अवरोध केलेला असतो ( ६.२०.२ ). आणि तो त्या जलावरच अजस्रपणें पहुडलेला असतो ( २.११.७ ). मोठमोठे पर्वतहि इन्द्र आपल्या वज्राने फोडून टाकतो, आणि त्यांतून नद्यांना वाहावयास लावतो ( १.५७.६; १०.८९.७ ). यांसारखीं, अक्षरशः असंख्य, वर्णनें ऋग्वेदांत वारंवार आलेलीं आहेत.[५] इन्द्राचा मरुद्गणाशीं अगदीं निकटचा संबंध आहे ( १.२५.९; ४७.३-४, ६.१७.११; १०.११३.३ ); आणि मरुद्देवता या प्रभंजनदेवता आहेत असें सामान्यपणें मानलें जातें.[६] या गोष्टीहि इन्द्र म्हणजे पर्जन्यदेवता या उपपत्तीस पुष्टि देणाऱ्या आहेत असें उपर्युल्लिखित विद्वानांचें मत आहे. 'इन्द्र' आणि 'इन्दु' या शब्दांचा भाषाशास्त्रीय संबंध प्रतिपादून मॅक्स म्यूलरने इन्द्राचा इन्दूंशीं — म्हणजे

---

( ३ ) Roth. *PIV*; Macdonell. *VM.* 54 ff; Oldenberg. *Rel. d. Veda*, 29, 51, 134ff; Perry. *JAOS* 11, 117-205; Bloomfield. *JAOS* 15, 143.

( ४ ) वर उल्लेखिलेल्या विद्वानांच्या मतें वेदांत मेघदैत्यास वृत्र, अहि, शुष्ण, शम्बर अशीं भिन्न भिन्न नांवें दिलेलीं आहेत.

( ५ ) पहा : १.३२, १.५५.४, १.८०, २.१२, १४,५.३२.१०, ६.१८.२, ३१.२, १०.९२.८ इत्यादि.

( ६ ) यासंबंधीं अधिक विचार पुढे थोडक्यात करावयाचा आहेच.

पर्जन्यनिर्देशी– संबंध जोडला आहे.[७] अशा प्रकारें इन्द्र-वृत्र-संघर्षाच्या वर्णनांत पर्जन्यसंबद्ध निसर्गघटनेचें चित्र अगदी स्पष्टपणें प्रतीत होतें असा या विद्वानांचा दावा आहे.[८]

ऋग्वेदांतील इन्द्रविषयक उल्लेखांचा विचार केला तर इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांत पर्जन्यदेवतेचे बरेच अंश–अस्पष्टपणें, व परोक्षतया का होईना पण – प्रतीत होतात हें नाकारतां येत नाहीं. पण ते अंश इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांतील मौलिक अंश होते, असें मानतां येईल काय? किंवा केवळ ते अंशच इन्द्राचें व्यक्तिमत्त्व संपूर्णतया व्यक्त करतात काय? असे प्रश्न याठिकाणीं सुचणें साहजिक आहे या प्रश्नांचीं योग्य उत्तरें मिळण्यास साधन म्हणून या बाबतींतील दोन तीन महत्त्वाच्या मुद्यांचा मी येथे उल्लेख करतों

इन्द्र-वृत्र संघर्षाच्या वर्णनांकडे जरा बारकाईनें पाहिलें तर पहिली गोष्ट आपणांस विशेषत्वानें जाणवते ती ही की, त्या सर्व वर्णनांत 'मेघ', 'विद्युत्', 'घनध्वनि', 'पर्जन्य' इत्यादि पावसाशीं निकटपणें संबद्ध असलेले शब्द प्रत्यक्षपणें केव्हाच उपयोजिलेले नाहीत तर नेहमी 'वृत्र', 'वज्र', 'पर्वत', 'आप' अशा शब्दांचाच त्या ठिकाणीं

(७) Max Muller *Chips* IV, 396 या भाषाशास्त्रीय संबंधाचा विचार करतांना 'इन्द्र' या शब्दाचा अर्थ इन्द्रास प्रिय असलेले 'सोमबिन्दु' असा कांहीं विद्वानांनी केलेला आहे

(८) इन्द्र ही एक विशिष्ट प्रकारची आकाशदेवता आहे असें रोथ याचें प्रथम मत होतें (*Zeller's Theol Jb* 1846, 352) लासेन (*Ind. Alter.* I, 893), बेनफे (*OO*, 48 ff.), मॅक्स म्यूलर (*Lect Sc Lg.* II, 470) यांनाहि रोथचें हें मत मान्य होतें. रोथने आपलें मत पुढे बदललें. मॅक्स म्यूलरच्या म्हणण्याप्रमाणें Jupiter (द्यौ पितर्) या देवतेचा वैदिक देवतशास्त्रांतील मूळचा प्रतियोगी इन्द्र हाच होता परंतु नंतर (*Chips* II, 91) त्या पंडिताने इन्द्र म्हणजे सूर्यदेवता असें मत प्रतिपादिलें आहे

उपयोग केलेला आहे. यामुळे असा प्रश्न उपस्थित करतां येईल की वेदांतील इन्द्र-वृत्र-संघर्षाच्या प्रतीकात्मक वर्णनांवरून पर्जन्यासंबंधींची निसर्गघटनाच वैदिक कवींच्या मनांत तेथे अभिप्रेत होती असें आपणांस निश्चितपणें म्हणतां येईल काय? वैदिक कवींच्या मनांत ती निसर्गघटनाच जर अभिप्रेत असती, तर एखाद्या वेळीं तरी पर्जन्यवृष्टीचा स्पष्टपणें वाचक असें वर्णन त्यांनी केलें असतें. बेर्गेन्य या फ्रेंच पंडिताने तर असें मत स्पष्टपणें व्यक्त केले आहे की इन्द्र हा पर्जन्यवृष्टीस जबाबदार आहे असा निर्देश ऋग्वेदात कोठेंहि आलेला नाही.(१) इन्द्र-वृत्र-संघर्षाच्या वर्णनांतील प्रतीकांवरून त्या संघर्षाचा अन्वयार्थ निरनिराळ्या रीतींनी — आणि, कमीजास्त प्रमाणांत, प्रत्ययदायी असा — लावतां येणें अशक्य नाही. आपल्या दैवतशास्त्रांतील प्रधानतम देवतेच्या मूळ स्वरूपाविषयीं अशी संदिग्धता वैदिक कवींनीं ठेविली होती असें मानणें उचित वाटत नाही. दुसरें असें की, पर्जन्यदेवतासिद्धान्तासाठीं आधार म्हणून जीं दोन समीकरणें त्या सिद्धान्ताच्या प्रवर्तकांनी गृहीत धरलीं आहेत तीं तरी कितपत ग्राह्य वाटतात? वज्र म्हणजे विद्युत् अशी कल्पना करावयास वेदांतील कोणतें वर्णन निश्चितपणे साधन म्हणून समजतां येईल? इन्द्राचें वज्र हें 'आयस' — म्हणजे कोणत्या तरी धातूचें केलेलें आहे (१.५२.८), त्याला चार किंवा शंभर कोण आणि सहस्र अग्रें आहेत (४.२२.२; ४.१७.१०; ८.६६, १.८०.२), वज्राशिवाय, इन्द्र धनुष्य-बाण-अंकुशादि इतर आयुधेंहि वापरतो (८.४५.४, ६६.६,११; १०.४४.९; १०.१०३.२-३)—या व अशाच वर्णनांवरून वज्र म्हणजे

(१) BERGAIGNE. *Rel. Ved* II, 185 ह्यांच्या मतें सबंध ऋग्वेदात फक्त एकच उल्लेख असा आहे की जेथे इन्द्र हा पर्जन्यदायक आहे असें स्पष्टपणें म्हटलें आहे (*VM* III, 165) इन्द्राने मुक्त केलेलें पाणी आकाशस्थ नसून पृथ्वीवरील नद्यांचें आहे असेंहि त्याचें म्हणणें आहे. इन्द्र-वृत्र-संघर्षांत वारंवार उल्लेखिलेले 'पर्वत' म्हणजे मेघच असें मानण्याचें कांहीच कारण नाही असें ओल्डेनबर्गहि म्हणतो (उ. ग्र., १६०)

इन्द्राला 'देवानां आनुजावर' असें संबोधिलें आहे ही गोष्टहि वरील अनुमानास पुष्टि देते. तेव्हा पर्जन्य आणि त्रित आप्त्य या दोन पर्जन्य देवता—कमी अधिक प्रमाणांत स्पष्टपणें प्रतीत होणाऱ्या पर्जन्यदेवता—अगोदरच वैदिक देवतशास्त्रांत अस्तित्वांत असतांना, इन्द्राचें—म्हणजेच परोक्षपणें व संदिग्धपणें भासमान होणाऱ्या पर्जन्यदेवतेचें—विशेष प्रयोजन काय हा या बाबतींत सुचणारा पहिला प्रश्न. वरें, त्रित आप्त्य आणि पर्जन्य यांविषयींच्या कल्पना इन्द्रकल्पनेनंतर वैदिक देवतशास्त्रांत उत्पन्न झाल्या असें मानावें तर इन्द्रासारखी सर्वश्रेष्ठ पर्जन्यदेवता अगोदरच अस्तित्वांत असतांना या दोन दुय्यम दर्जाच्या पर्जन्यदेवतांचें प्रयोजन काय असा दुसरा प्रश्न उद्भवतो पर्जन्याविषयींच्या आक्षेपास असें उत्तर दिलें जाईल की, इन्द्र म्हणजे प्रत्यक्ष पर्जन्य नव्हे, तर पर्जन्य देणारी देवता आहे.[11] म्हणजेच इन्द्र आणि पर्जन्य यांच्यात भेद आहे पण त्रित आप्त्यासंबंधीं मात्र असें कोणतेंच स्पष्टीकरण देतां येणार नाही.

त्रिताचें आप्त्य हें उपनामच ती देवता पर्जन्याभिमानी देवता होती असें स्पष्टपणें सुचवितें. केवळ त्रित आप्त्य या देवतेस उद्देशून लिहिलेलें एकहि संपूर्ण सूक्त ऋग्वेदात उपलब्ध नाही. परंतु त्याच्यासंबंधी जे निरनिराळे सुमारें चाळीस उल्लेख ऋग्वेदात आले आहेत त्यांचा सूक्ष्म अभ्यास केल्यास त्यावरून काही महत्त्वाच्या गोष्टी स्पष्ट होतात पहिली गोष्ट अशी की त्रित आप्त्य ही मुख्यत पर्जन्यसंबद्ध देवता आहे[12] दुसरी गोष्ट अशी की त्रित

(११) येथे एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे ती म्हणजे ही की पाऊस पडावा म्हणून जे यातुयान विधि करतात ते नानान्यत इंद्राव्यतिरिक्त देवतांस उद्देशूनच असतात

(१२) उदाहरणार्थ ऋ. ५.८३.२ पहा ... वारे जोराने पुढे जातात, विजा चमकतात, त्रित गर्जना करतो आणि सागराचे लाटा ... वाढू लागतात"

आप्त्याचा इन्द्राशीं अनेकदा संबंध आणला आहे; पण तो अगदीं नंतरचा आणि कृत्रिम स्वरूपाचा असा वाटतो. किंबहुना, तो संबंध कांहीं विशिष्ट हेतूनें घडवून आणला असावा असें वाटूं लागतें. आणि तिसरी गोष्ट म्हणजे त्रित आप्त्याला उद्देशून रचिलेले अनेक मन्त्र पूर्वी अस्तित्वांत असले पाहिजेत, पण तेहि कांहीं विशिष्ट कारणांमुळे मागे पडले असावेत. या सर्व गोष्टींचा चिकित्सापूर्वक विचार केला तर त्यावरून पुढील निष्कर्ष काढतां येण्यासारखे आहेत. त्रित आप्त्य ही आर्यांच्या देवतशास्त्रांतील मूळची पर्जन्यदायी देवता असली पाहिजे. त्रितासंबंधी जे थोडे वैदिक मंत्र आणि इतर परोक्ष उल्लेख उपलब्ध आहेत ते इतर मन्त्रांच्या तुलनेनें दुर्बोध असे आहेत. त्यांवरून आणि त्या देवतेची प्रतियोगी देवता Thrita ही अवेस्तांत उल्लेखिलेली आहे यावरून त्रित ही एक प्राचीन देवता असावी असें वाटूं लागतें. परंतु या देवतेचें महत्त्व पुढे पुढे कमी होत गेलें,[13] आणि त्यामुळे त्या देवतेस उद्देशून रचिलेले अनेक मंत्रहि मागे पडले. त्रिताचें महत्त्व कां व कसें कमी झालें असावें हें समजून घेण्याचें साधनहि वेदांत उपलब्ध आहे. त्रित आप्त्याच्या संबंधीच्या उल्लेखांत, बऱ्याचशा कृत्रिमपणें, इन्द्राचा समावेश केला गेला आहे या गोष्टींतच आपणांस वरील प्रश्नांचें उत्तर सापडूं शकेल. इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांतील पर्जन्यदेवताविषयक अंश अगदीं संदिग्ध आणि परोक्ष स्वरूपाचे आहेत हें मागे सुचविलेंच आहे. त्याबरोबरच असेंहि सुचविलें आहे की एतद्विषयक वैदिक उल्लेखांवरून, इन्द्राच्या मुळांत भिन्न असलेल्या व्यक्तिमत्त्वावर पर्जन्यदेवताविषयक अंशांचा आरोप केला गेला आहे ही गोष्ट पश्चाद्बुद्धीचा, afterthought चा,

---

(१३) ऋ. १·१०५·९; ८·४७·१३–१७ इत्यादि उल्लेख या संदर्भांत विशेष महत्त्वाचे आहेत. ऋग्वेदांतील कांहीं मडलांत त्रिताचा मुळींच उल्लेख आलेला नाहीं ही गोष्टहि येथे लक्षांत घेण्यासारखी आहे

विद्युत् अशी कल्पना सामान्यतः मनांत येत नाही. तें एक विशिष्ट प्रकारचें आयुध असलें पाहिजे असेंच वाटूं लागतें. वृत्र म्हणजे मेघ या समीकरणाविरुद्ध तर अनेक आक्षेप घेतां येतील. प्राचीन इराण्यांच्या अवेस्तांतहि 'वरथ्र' हा शब्द अनेकदा वापरलेला आहे. आणि भाषाशास्त्रदृष्ट्या तो शब्द वैदिक 'वृत्र' या शब्दाशीं निःसंशयपणें संबद्ध आहे. अवेस्तांतील वरथ्र या शब्दाचा अर्थ काय आहे, याचें सविस्तर विवेचन मला पुढे करावयाचेंच आहे. पण त्या शब्दास 'मेघ' असा अर्थ इरान्वयानेंहि प्राप्त झालेला नाही हें मात्र मी येथे निश्चितपणें सांगूं इच्छितों. ही एकच गोष्ट, माझ्या मतें, इन्द्र ही पर्जन्यदेवता आहे या सिद्धान्तास पूर्णपणें बाधक ठरते. अवेस्तांतील वृथ्रघ्न (=वैदिक 'वृत्रहन्') या देवतेचाहि पर्जन्याशीं मुळींच संबंध नाही. शिवाय इन्द्र ही मुख्यतः पर्जन्यदेवता आहे असें वादाकरितां क्षणभर गृहीत धरलें तर अवेस्तांत इन्द्राचें 'आन्द्र' या नांवाने एक निन्द्य दैत्य असें स्वरूपान्तर कां व्हावें हा प्रश्न विचारतां येण्यासारखा आहे. वेदांतील वृत्र कोण असला पाहिजे हें निश्चित करण्यासाठी हिलेब्रांटने इन्द्र-वृत्र-संघर्षाच्या वर्णनांत जे, जवळजवळ पारिभाषिक बनलेले, शब्द वैदिक कवींनी विशेष अर्थानें आणि वारंवार वापरले आहेत त्यांचा चिकित्सापूर्ण आणि विश्लेषणात्मक अभ्यास केलेला आहे.[१०] उदाहरणार्थ, अपि+धा, ग्रस्, बाध्, रुध्, वृ, स्तम्, परि+स्था इत्यादि क्रियापदांचा विचार करून हिलेब्रांटने असें सिद्ध केलें आहे की या क्रियापदांवरून पर्जन्यवृष्टीच्या निसर्गघटनेचा मुळींच बोध होऊं शकत नाही. वरील सर्व विवेचनावरून एक अभ्युपगम निश्चितपणें पुढे मांडण्यास हरकत नाही. तो असा की, ऋग्वेदांतील इन्द्र-वृत्र-संघर्षाचें वर्णन लक्षांत घेतां तें वर्णन निःसंदिग्धपणें—आणि मौलिकपणें—पर्जन्यवृष्टीस लागू पडतेंच असें गृहीत धरतां येत नाही. केवळ प्रतीकात्मक शब्दांचाच

(१०) हिलेब्रांट, उ. ग्रं., १७४-७५.

विचार करावयाचा तर तें वर्णन दुसऱ्या एखाद्या निसर्गघटनेसहि लागू पडण्यासारखें आहे. आणि म्हणून इन्द्र ही मूलतः पर्जन्यदेवता होती असें अनुमान करणें सयुक्तिक वाटत नाही. किंबहुना, पर्जन्यसंबद्ध धर्मापेक्षा मानवी धर्मच इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांत अधिक आहेत असें म्हणणेंहि अतिशयोक्तीचें होणार नाही.

इन्द्र हा कांही विशिष्ट रीतीने जन्मास आला; त्याने आपल्या पराक्रमांमुळे देवत्व मिळविलें; तो सोमरसाचा अत्यंत अभिलाषी होता —वगैरे धर्म एखाद्या निसर्गशक्तीपेक्षा मानवी वीरालाच अनुरूप असे आहेत. इन्द्राची बहुसंख्य वर्णनें इतकीं वास्तव—इतकीं मानवी-जीवनाश्लिष्ट—आहेत की तीं एखाद्या निसर्गशक्तीचीं प्रतीकात्मक वर्णनें असतील अशी शंकासुद्धा मनांत येत नाही. इन्द्राच्या बाबतींत वैदिक कवींनी एका निसर्गशक्तीवर मानवी धर्मांचा आरोप केला असें नसून एका मानवावर निसर्गशक्तीच्या धर्मांचा आरोप केला असणें अधिक सयुक्तिक वाटतें. इन्द्राच्या वर्णनांत दिसून येणारी मानवी धर्मांची स्पष्टता आणि निसर्गधर्मांची संदिग्धता व दूरान्वितता या गोष्टी वरील म्हणण्यासच पुष्टि देतात.

या संदर्भात आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीचा उल्लेख करणें अवश्य आहे. इन्द्र ही मूलतःच पर्जन्यदेवता होती असें वाद करिता क्षणभर गृहीत धरलें तर त्याच्या व्यतिरिक्त आणखी दोन पर्जन्यसंबद्ध देवता वैदिक दैवतशास्त्रांत अस्तित्वांत होत्या असें मानावें लागेल. त्या दोन देवता म्हणजे पर्जन्य आणि त्रित आप्त्य या होत. या तीन पर्जन्य-संबद्ध देवतांमध्ये इन्द्र ही देवता पर्जन्य आणि त्रित आप्त्य या दोन्ही देवतांच्या नंतर निर्माण केलेली देवता असली पाहिजे. खरें पाहिलें असतां वैदिक देवतामंडळांतच इन्द्राचा प्रवेश बऱ्याच उशीराने झाला असें म्हणावें लागतें. यासंबंधीची वाङ्मयीन परंपरा तैत्तिरीय ब्राह्मणांत (२.२.२.३; २.२.७.२) उपलब्ध आहे. तैत्तिरीय संहितेंत (२.३.४.२)

परिणाम असला पाहिजे, हें स्पष्टपणें कळून येतें. या सर्वांचा अर्थ असा की, कांहीं विशिष्ट कारणांमुळे, मूळच्या भिन्नप्रकृति इन्द्रदेवतेस वैदिक कवींनी उत्तरकाळीं पर्जन्यदेवतास्वरूप दिलें. ही घटना घडून येण्यापूर्वीच इन्द्र ही सर्वश्रेष्ठ अशी देवता मानली गेली असल्यामुळे तिच्या पर्जन्यदेवतास्वरूपासहि मोठें महत्त्व प्राप्त झालें आणि याचा परिणाम असा झाला की वेदांतील–किंबहुना, आर्यांच्या देवतशास्त्रांतील–मूळची पर्जन्यदेवता जी त्रित आप्त्य तिच्यावर या नवीन, कृत्रिम स्वरूपाच्या, कविकल्पित अशा पर्जन्यदेवतेने–म्हणजेच इन्द्रदेवतेने–मात केली. त्रित आप्त्य मागे पडला;[१८] त्याचें मूळ स्वरूप दुर्बोध बनूं लागलें आणि त्याला उद्देशून रचिलेले अनेक मन्त्रहि नाहीसे झाले. पण इन्द्राच्या कृत्रिम आणि पश्चाद्बुद्धिजन्य अशा पर्जन्यदेवतास्वरूपाला ठामपणा आणण्यासाठी त्याचा, निःसंदिग्धपणें पर्जन्यदेवता असलेल्या त्रित आप्त्याबरोबर, मुद्दाम उल्लेख केला जाऊं लागला. त्रिताचें मूळचें पर्जन्यदेवतास्वरूप, इन्द्राचें कृत्रिम पर्जन्यदेवतास्वरूप, त्या स्वरूपांतील इन्द्राने त्रितावर एका अर्थी त्याच्याच साहाय्याने केलेली मात–या सर्व गोष्टी ऋग्वेदांतील त्रित आप्त्य आणि इन्द्र यांस उद्देशून रचिलेल्या मन्त्रांच्या तौलनिक अभ्यासाने सुस्पष्टपणें प्रत्ययास येतात. वेदांतील प्रमुख पर्जन्यदायी देवता हें त्रित आप्त्याचें स्थान इन्द्राने नंतर बळकावलें याला पुरावा ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलांतील बावन्नाव्या सूक्ताच्या पाचव्या ऋचेंत मिळण्यासारखा आहे.

> अभि स्वर्वृष्टिं मदें अस्य युध्यंतो
>
> रघ्वीरिव प्रवणे संस्रुस्तयः ।

---

(१८) उदाहरणार्थ ऋ. ००३६.१० पहा ' जेव्हा नव्हा [illegible] कवींनया [illegible] दर्शी पाहल्या. … …" अथर्ववेदांतील त्रितविषयक उल्लेखी [illegible] विस्तृत चालविल्या ऐवजी द्योतक आहेत

इन्द्रो यद्वज्री धृषमाणो अन्धसा

भिनद्वलस्य परिधीँरिव त्रितः ॥ ( १.५२.५ )

या मन्त्रांत असें स्पष्टपणें सुचविलें आहे की पर्जन्यवृष्टि घडवून आणण्याचें आपलें वीरकर्म इन्द्रानें त्रिताप्रमाणे—त्रितः इव—साधलें. म्हणजे जें कार्य पूर्वी त्रित जसें करीत असे तेंच आता इन्द्राने तसेंच केलें.[१५] मूळच्या भिन्न स्वरूपाच्या इन्द्रदेवतेवर वैदिक कवींनी पुढे पर्जन्यदेवतास्वरूपाचा आरोप केला, ही आतापर्यंत स्पष्ट झालेली गोष्टच माझ्या इन्द्रविषयक पुढील विवेचनाचा उचित असा प्रारंभबिन्दु होऊ शकेल!

हिलेब्रांटने इन्द्र-वृत्र संघर्षाचें आविष्करण निराळ्याच रीतीने केलेलें आहे.[१६] इन्द्र म्हणजे पर्जन्यदेवता हेंच मत हिलेब्रांट यास प्रथम ग्राह्य वाटत होतें. पण वैदिक वाङ्मयांतील व यागविधींतील इन्द्रविषयक उल्लेखाचा अधिक सूक्ष्म विचार केल्यावर त्या पंडितास आपलें मत बदलावेंसें वाटलें. पर्जन्यदेवतासिद्धान्ताविरुद्ध अनेक आक्षेप हिलेब्रांटने उपस्थित केले आहेत. इन्द्र-वृत्र-संघर्षाच्या वर्णनांत वारंवार उपयोजिल्या जाणाऱ्या क्रियापदांची त्याने केलेली चिकित्सा व तीवरून काढलेला निष्कर्ष यांचा उल्लेख वर आलेलाच आहे. तसेंच त्या वर्णनांत आलेले 'पर्वत' 'आपः' वगैरे शब्द प्रतीकात्मक रीतीने 'मेघ' 'पाऊस' वगैरे अर्थी वापरलेले नसून त्यांचे वाच्यार्थच—म्हणजे पृथ्वीवरील पर्वत, नद्यांचें पाणी वगैरे—त्या ठिकाणीं अभिप्रेत आहेत असेंहि हिलेब्रांटचें म्हणणें आहे. तो पुढे विचारतोः मेघास दैत्यस्वरूप मानणें हें

(१५) पर्जन्यवृष्टिप्रतिबंधक दैत्यांचा निःपात करण्याचें त्रिताचें कर्तृत्व पूर्वकालीं इतकें मौलिक स्वरूपाचें असलें पाहिजे की त्रिताच्या व्यक्तिमत्त्वाचा तो विशेष उत्तरकालीं उपमान म्हणून उपयोजिला जाऊं लागला.

(१६) HILLEBRANDT. VM III, 155–344.

भारतीय कवींच्या नेहमीच्या संकेतांस धरून आहे काय ? एकूण, इन्द्र म्हणजे पर्जन्यदेवता ही उपपत्ति सर्वथैव अस्वीकार्य आहे असें मत त्याने स्पष्टपणें पुढें मांडलें आहे. हिलेब्रांटच्या मतें वृत्र हा हिमऋतुदैत्य होता. हिमऋतूंत सर्व नद्या गोठून जातात, आणि त्यामुळे जलप्रवाहाचा अवरोध होतो. अशा वेळीं, इन्द्र–म्हणजेच वासन्तिक सूर्य–आपल्या तेजस्वितेने वृत्राचा निःपात करतो–म्हणजे बर्फास वितळवितो–आणि नद्यांचा प्रवाह पुन्हा वाहावयास लावतो. सारांश, इन्द्र ही पर्जन्यदेवता नसून मूळची सूर्यदेवताच असली पाहिजे असें हिलेब्रांटचें मत आहे.[१७]

हिलेब्रांटच्या या उपपत्तीवर अनेक आक्षेप घेतां येण्यासारखे आहेत. 'वज्र' आणि 'वृत्र' या शब्दांना आधारभूत असलेल्या कल्पना, मागील पर्जन्यदेवतासिद्धान्ताप्रमाणे, या सूर्यदेवतासिद्धान्तालाहि विरोधी अशाच आहेत.[१८] सूर्याचें 'वज्र' म्हणजे काय ?[१९] आणि 'वृत्र' म्हणजे हिवाळारूपी दैत्य ही कल्पना पुसटपणें सुद्धा अवेस्तांत

(१७) वेदांत कांहीं ठिकाणीं वृत्राचा 'शयान' (झोपलेला) असा उल्लेख केलेला आहे. 'हिवाळा म्हणजे सृष्टीची निद्रा' या कविकल्पनेचा आधार घेऊन हिलेब्रांटने वृत्राचा हिवाळ्याशीं संबंध जोडला आहे. इन्द्राने रौहिण नांवाच्या दैत्याचा निःपात केल्याचें ऋग्वेदांत सांगितलें आहे. रौहिण हें वृत्राचेंच दुसरें नाव असलें पाहिजे. रौहिण म्हणजे रोहिणीपति चन्द्र, आणि चन्द्र हा हिवाळ्याचा स्वामी यावरूनहि वृत्र = हिमऋतुदैत्य हें समीकरण सिद्ध करण्याचा त्या पंडिताने प्रयत्न केला आहे. इन्द्राला माध्याह्नसवन अर्पण करतात (श. प. ब्रा. २·४·४·१२–१३) व त्या देवतेचा ग्रीष्मऋतूशीं विशेष प्रकारचा संबंध असल्याचें दाखविलें आहे (मै. सं. २·७·२०) या गोष्टी इन्द्र = सूर्यदेवता या समीकरणास पुष्टि देतात, असेंहि हिलेब्रांटचें म्हणणें आहे.

(१८) किंबहुना, पर्जन्यदेवतासिद्धान्ताविरुद्ध उपस्थित केलेले अनेक आक्षेप तितक्याच सुलभतेने सूर्यदेवतासिद्धान्ताविरुद्धहि उपस्थित करतां येतील.

(१९) वज्र हें 'आयस' आहे अशा प्रकारचीं वर्णनें वज्र म्हणजे दाहक सूर्यकिरणें या समीकरणास अगदी बाधक ठरतील.

कां दिसून येत नाहीं ? ऋग्वेदांत कांहीं ठिकाणीं ( १.३२.४; २.१२.७; ३.३१.१५; ६.१७.३; ) इन्द्र आणि सूर्य या देवतांचा एकमेकांशेजारीं उल्लेख केलेला आहे ही गोष्ट सूर्यदेवतासिद्धान्तविरोधी नाहीं काय ? तसेंच, हिमऋतूनें नद्यांचे प्रवाह गोठवून टाकले आहेत असा अनुभव येण्याची शक्यता तरी आर्यांच्या जीवनांत कितपत होती ? त्या गोष्टीस वैदिक दैवतशास्त्रांतील प्रधानभूत अशा घटनेंतील मध्यवर्ती कल्पना मानून तिचा इतका वारंवार उल्लेख करावा लागण्याइतकी तरी खास नसली पाहिजे. 'गोठणें', 'बर्फ' असा स्पष्ट अर्थ असलेले शब्दहि वैदिक भाषेंत जवळजवळ नव्हतेच असें म्हटलें तरी चालेल. शिवाय, इन्द्र-वृत्र-संघर्षाच्या वेळचें इन्द्राचें वीरश्रीप्रधान, आणि थोडेंफार भीतिजनक, असें जें वर्णन वेदांत केलेलें आहे, तें मृदु आणि तुलनेनें शांत अशा वासंतिक सूर्याला मुळींच लागू पडण्यासारखें नाहीं.[20]

कांहीं पंडितांनीं वृत्राला अन्धकाराचा दैत्य कल्पून इन्द्राला सूर्यदेवता मानलें आहे.[21] हॉपकिन्सनें या बाबतींत अशी उपपत्ति पुढें

---

(२०) स्वतः हिलेब्रान्टनें या बाबतींत शेवटीं आपलें असें मत प्रदर्शित केलें आहे कीं इन्द्र हा मूळचा सूर्यदेवतास्वरूप होता, पण वेदांत त्याचें हें सूर्यदेवतास्वरूप फारसें शिल्लक राहिलें नाहीं; त्याचबरोबर हेंहि खरें कीं वेदांत इन्द्राला पर्जन्यदेवतास्वरूपहि पूर्णपणें प्राप्त झालें नव्हतें ( *VM* III, 195-96 ).

(२१) इन्द्रानें वृत्रावर मिळविलेला विजय म्हणजेच प्रातःकाळीं सूर्यानें अन्धकारावर घेतलेली मात असें मॅक्स म्यूलरचें मत आहे ( *Contribution to the Science of Mythology* I, 141–42 ). उत्तर ध्रुवावर कांहीं महिने अखंडितपणें सत्ता गाजविणाऱ्या अंधकारदैत्यावर विजय मिळविणारा सूर्य म्हणजे इन्द्र असें टिळकांचें म्हणणें आहे ( *Arctic Home*, 233 ff. ). ज्योतिषशास्त्राच्या आधारें वैदिक दैवतशास्त्राचा अर्थ लावूं पाहणाऱ्या शामशास्त्रींनींहि इन्द्रास सूर्यच मानिलें आहे. पण त्यांच्या मतें इन्द्रानें पराभूत केलेले वृत्र-शंबरादि दैत्य हे ग्रहणांचे ( Eclipse ) द्योतक आहेत ( *Thomas Comm. Vol.*, 257–61 ).

मांडली आहे की इन्द्र हा मूळचा प्रभूतफलत्वाचा-अवन्ध्यत्वाचा देव-fertility-god—असावा.[२२] त्याच्या ठिकाणीं सूर्यदेवतेचे कांहीं अंश आणि पर्जन्यदेवतेचे कांहीं अंश आहेत. आणि बहुसस्यदायित्वाला हे दोन्हीं प्रकारचे अंश अवश्य असेच आहेत. या व अशाच प्रकारच्या निरनिराळ्या उपपत्तींचें विस्तृत विश्लेषण न करतां मी येथे येवढेंच सांगू इच्छितों कीं त्यांपैकीं कोणत्याहि उपपत्तीने इन्द्र-वृत्र-संघर्षाचा योग्य असा अन्वयार्थ लागूं शकत नाही.

इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वाचें ऋग्वेदांत जें प्रभूत आणि तपशीलवार वर्णन आलें आहे त्यांतील कांहीं गोष्टी विशेषत्वाने लक्षांत घेण्यासारख्या आहेत. कोणत्याहि इतर वैदिक देवतेपेक्षा, इन्द्राच्या वर्णनांतच वैदिक कवींनीं मानवी स्वरूपाचा आणि मानवी स्वभावधर्माचा उपयोग अधिक उत्कटतेने केलेला आहे. वैदिक आर्यांच्या जीवनाशीं—वैयक्तिक आणि सामाजिक जीवनाशीं—इन्द्राइतका निकटचा आणि जिवंत संबध दुसऱ्या कोणत्याहि देवतेचा आलेला नाही. तसेंच, इन्द्राचीं जीं निरनिराळीं वीरकर्में ऋग्वेदीय कवींनी गौरविलीं आहेत, त्यांत मानवीवीरोचित अशीं कर्मेंच अधिक आहेत. कांहीं वैदिक निर्देशांत इन्द्राचा निसर्गातील एखाद्या घटनेशीं किंवा शक्तीशीं संबंध जोडला गेला आहे यांत शंका नाहीं. पण त्या निर्देशांचा बारकाईने विचार केल्यास असें स्पष्टपणें प्रत्ययास येतें कीं इन्द्राचें त्या घटनेशीं किंवा शक्तीशीं सारूप्य निर्माण झालेलें नाही. त्या घटनेशीं किंवा शक्तीशीं संबंध असूनहि आपण स्वतः त्यापासून भिन्न किंवा वेगळा राहिला अशी तेथे इन्द्राची स्थिति आहे. म्हणजेच त्या घटनेशीं किंवा शक्तीशीं इन्द्राचा संबंध दुय्यम प्रकारचा, कविकल्पित, पश्चाद्बुद्धीने आरोपित, आणि कृत्रिम असा आहे. एखाद्या निसर्गशक्तीला देवतास्वरूप दिल्यामुळे इन्द्रविषयक दैवतशास्त्रीय कल्पना उद्भूत झाली असें मानलें तर इन्द्र हा जन्मास आला — कांहीं विशिष्ट रीतीने

---

(२२) *JAOS* 36, 242 ff.

जन्मास आला[२३] – ही त्याच्या जीवनांतील जी घटना अनेकदा उल्लेखिली गेली आहे (३-४८;४-१८) तिचें आन्वर्थक्य लक्षांत येत नाही. इन्द्राचें देवपद जन्मसिद्ध नव्हतें, तें त्याने आपल्या पराक्रमाने मिळविलें होतें असें जें वैदिक वाङ्मयांत अनेक ठिकाणीं सुचविलें आहे[२४] तें तर त्याच्याविषयी निसर्गशक्तिवाद्यांनी ज्या निरनिराळ्या उपपत्ति पुढे मांडल्या आहेत त्यांना निश्चितपणें बाधक होणार आहे. ऋग्वेदांत आलेलीं इन्द्राच्या स्वरूपाचीं वर्णनें देखील इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांतील मानवी अंशांचा ठसाच आपल्या मनावर विशेषत्वाने उमटवितात. एखाद्या निसर्गशक्तीवर मानवी स्वरूपाचा आरोप केल्याचा तो परिणाम आहे असें मुळींच वाटत नाही. इन्द्राचें 'सुशिप्रत्व' ( २.१२.६; ३३.५), त्याचे दीर्घ हस्त ( १.८०.५; ४.२१.९), त्याचे हिरण्यवर्ण केश व हिरण्यवर्ण श्मश्रु ( १०.९६.५; २३.४ ), त्याने धारण केलेलीं वज्रादि विशिष्ट प्रकारचीं आयुधें, त्याचा विशिष्ट प्रकारचा रथ – या सर्व चिह्नांवरून आर्यांच्या एखाद्या महान् नेत्याचें चित्रच प्रत्यक्षपणें आपल्यापुढे उभें राहत नाही काय ? ऋग्वेदांत इन्द्राच्या कांहीं विशिष्ट लकबींचे –Mannerisms चे – जे उल्लेख आलेले आहेत ( २.११.१७; ३.२१.१; ८.६५.१०; १०.२३.१ ) तेहि या संदर्भांत विशेष लक्षांत घेण्यासारखे आहेत. इन्द्रास सोमाविषयीं वाटणारी आत्यंतिक अभिलाषा प्रतीकात्मक स्वरूपाची वाटत नाही, तर जिवंत अशी वाटते.[२५]

---

( २३ ) इन्द्र आपल्या मातेच्या पार्श्वांतून जन्मास आला असें ऋग्वेदांत (४.१८.१–२ ) सुचविलें आहे. शिकंदराविषयींहि अशाच आख्यायिका सांगतात; पण त्यामुळे त्याच्या ऐतिहासिकतेला बाध येत नाही.

( २४ ) ऋ. ७.१२.१; ७.२१.७; तै. सं. २.३.४ ?; तै. ब्रा. २.२.३.२; २.२.७.२; मै. सं. १.६.४; ऐ. ब्रा. ८.४.१२.

( २५ ) पहा : ऋ. २.१५.१; ३.४८.४; ५.२९.७; ८.४.८; ८१.६.

यासंबंधांत माझ्या मतें सर्वांत महत्त्वाची जर कोणती गोष्ट असेल तर ती ही की इन्द्राचें वर्णन करतांना वैदिक कवींनी त्या देवतेशीं पुष्कळच स्वातंत्र्य घेतलेलें आहे. सामान्य मानवांत दिसून येणारीं स्वभावन्यूनें — human weaknesses — त्यांनी इन्द्राच्या ठिकाणीं पाहिलीं. इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांत 'अतिमानवा'चा आणि 'मानवा'चा जो हृदयंगम संगम झालेला आहे त्यावरून त्या देवतेचें वास्तव स्वरूप तावडतोब लक्षांत येतें. त्याच्या स्वभावधर्मातील या विरोधामुळेच त्याच्या व्यक्तिमत्त्वाला जिवंतपणा प्राप्त झालेला आहे. केवळ प्रतीकात्मक वर्णनांत सामान्यत: असा जिवंतपणा असूं शकत नाही. सोमपान करून मदस्फूर्त झालेल्या इन्द्राचें जें विडंबन वैदिक कवींनी लवसूक्तांत (१०·११९) केलेलें आहे तें तर या बाबतींत अतिशय उद्बोधक ठरेल. एखाद्या व्यक्ती-विषयीं आपल्या मनांत गाढ आदर आणि साभिमान प्रेम वाटत असतांहि त्या व्यक्तीच्या स्वभावातील कांहीं न्यूनास उद्देशून — आणि तीं न्यूनेंहि त्या व्यक्तीच्या मोठेपणास शोभतील अशींच अनन्यसाधारण असतात — त्या व्यक्तीची विडंबनात्मक चेष्टा करतांना जी एक विशिष्ट भावना आपल्या मनांत असते तशीच भावना लवसूक्ताच्या कर्त्यांच्या मनात असली पाहिजे तें सूक्त वाचूं लागलें कीं मला तरी आपल्याला आदरणीय वाटणाऱ्या नेत्यांचींहि जीं व्यंगचित्रें आजकाल काढलीं जातात — तिरस्काराची किंवा अवमानाची मुळींच छटा नसलेलीं अशीं व्यंगचित्रें काढलीं जातात — त्यांची आठवण होते. इन्द्राची सोमविषयक अतिरिक्त अभिलाषा, स्त्रियांविषयीं त्याला वाटणारें विशिष्ट प्रकारचें कुतूहल (२·१५·७, ७·२८·२, ८·३३·१७, ९१, काठक २·४७·९), वृषाकपीच्या 'प्रसादा'नें झालेलें त्याचें वीर्यवर्धन (१०·८६), कांहीं विशिष्ट प्रसंगीं या बलाढ्य वीरासहि प्राप्त झालेली भीतिग्रस्तता (१·३२·१४), नेहमी त्याच्याशीं एकनिष्ठ राहणाऱ्या मरुतांशीं कांहीं वेळीं उडालेले त्याचे खटके (१·१७० २, १७१·६, ८·७·३१, १·१२५) — या गोष्टी इन्द्राच्या मानवत्वाच्या आणि ऐतिहासिकत्वाच्याच द्योतक नाहीत काय?

एवंच आकृतिदृष्ट्या आणि प्रकृतिदृष्ट्या इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांत मानवी अंशच उत्कटपणें अस्तित्वांत असलेले आपणांस दिसून येतात. पण मानवी अंशांइतक्याच उत्कटपणें – किंबहुना अधिक उत्कटपणें – वैदिक कवींनी इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांतील अतिमानव अंशांचाहि ( Superhuman elements ) उल्लेख केलेला आहे. इन्द्र हा कल्पनातीत प्रमाणांत बलाढ्य आहे ( १.८०.१५; ६.२१.१०; ७.२१.७ ); तो अगदीं अजिंक्य आहे ( ४.१७.१९; २०.२ ); पराक्रमाच्या बाबतींत कोणीहि त्याच्या तुलनेस टिकणार नाहीं ( १.१६५.९ ); अशा प्रकारचीं ऋग्वेदांत आढळून येणारीं अक्षरशः असंख्य वर्णनें, 'शक्र' 'शचीवत्', 'मनस्वान्' वगैरे त्याच्या निविदा, अखंड यौवन आणि शौर्य यांचें प्रतीक म्हणजेच इन्द्र अशा अर्थाचे उल्लेख ( २.१६.१; ३.३२.७ )–या सर्व गोष्टी इन्द्राच्या अतिमानवत्वाच्याच निदर्शक आहेत. इन्द्राच्या या युधिवीरत्वाबरोबरच त्याच्या दानवीरत्वाचाहि वैदिक कवींनी वारंवार गौरव केलेला आहे ( १.३०.१; ४.३१.७; ८.१४.४ ). 'मघवा' हें अभिधान केवळ इन्द्रासच शोभण्यासारखें आहे अशा प्रकारें, मागे म्हटल्याप्रमाणे, इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांत 'मानवत्व' आणि 'अतिमानवत्व' यांचा हृद्यगम संगम घडून आलेला आहे. अगदीं यथार्थत्वानें इन्द्राच्या मूळच्या व्यक्तिमत्त्वाचें वर्णन करावयाचें तर असें करतां येईल की इन्द्र हा 'देव' हि नव्हता किंवा सामान्य 'मानव' हि नव्हता–तो 'अतिमानव' होता, 'वीर', Hero होता. आपल्या इन्द्रविषयक विवेचनांतील हा दुसरा टप्पा आहे असें समजावयास हरकत नाहीं.

इन्द्र हा मूलतः कोणत्याहि निसर्गशक्तीचा निदर्शक नसून, एक मानवसहज स्वभावान्यूनें असलेला, पण अतिमानवोचित पराक्रम गाजविणारा वीर होता. परंतु, वैदिक दैवतशास्त्राच्या विकासक्रमांतील एका अवस्थेंत त्यानें आर्यांची मूळची पर्जन्यदेवता जी त्रित आप्त्य तिला स्थानभ्रष्ट करून त्या देवतेचे कांहीं स्वभावविशेष आपल्या व्यक्तिमत्त्वांत

आत्मसात् करून घेतले असले पाहिजेत, हें आतापर्यंतच्या विवेचनावरून सहज पटण्यासारखें आहे असें मला वाटतें. मग आता या बाबतींत दोन प्रश्न साहजिकपणेंच उद्भवतात ते असे : या अतिमानव वीराचें प्रमुख कर्तृत्व काय होतें की ज्यामुळे प्रत्यक्ष देव नसतांनाहि त्याला देवाधिदेवाचें श्रेष्ठपद प्राप्त व्हावें ? आणि या अतिमानव वीराच्या व्यक्तिमत्त्वांत पर्जन्यदेवतेचे कांहीं स्वभावविशेष शिरले याचें कोणतें सयुक्तिक कारण देतां येईल ?

यांपैकी पहिल्या प्रश्नाचा आपण प्रथम विचार करूं ! ‘ वृत्रहा ’ हें इन्द्राचें अनन्यसाधारण असें बिरुद आहे. आणि त्या शब्दांतच इन्द्राच्या वीरकर्माचें रहस्य सापडण्यासारखें आहे. ‘ वृत्र ’ म्हणजे तरी काय ? तो मेघरूपी, किंवा हिमऋतुरूपी, किंवा अन्धकाररूपी असा प्रतीकात्मक दैत्य नव्हता हें आपण मागे पाहिलेंच आहे. मग निरुक्त-कारांनी उद्धृत केलेल्या ऐतिहासिकांच्या मताप्रमाणे तो ‘ त्वाष्ट्र असुर ’ असूं शकेल काय ? म्हणजेच वृत्र ही एखादी विशिष्ट अशी व्यक्ति होती काय ? या प्रश्नाचें उत्तर निश्चितपणें नकारात्मकच द्यावें लागेल. वेदांत वर्णिलेले वृत्राचे स्वभावधर्म इतके रंगहीन ( colourless ) आणि सांकेतिक स्वरूपाचे ( conventional ) आहेत की त्यांवरून कोणत्याहि एखाद्या विशिष्ट व्यक्तीचें चित्र आपल्या मनश्चक्षूंसमोर निर्माण होत नाही. अवेस्तांतील ‘ वरघ्र ’ ही एक अमूर्त कल्पना ( abstract concept ) आहे, मूर्त व्यक्ति ( concrete personality ) नाहीं. दुसरें असें की वृत्र हा शब्द मूळचा नपुंसकलिंगी असला पाहिजे असें मानण्यास भरपूर पुरावा वैदिक वाङ्मयांत उपलब्ध आहे. अवेस्तांत तर तो शब्द केवळ नपुंसकलिंगीच वापरला आहे. ‘ वृत्र ’ या शब्दाचें बहुवचन ‘वृत्राणि’ असेंच सामान्यतः ऋग्वेदांत उपयोजिलेलें जागोजाग आढळतें. वृत्राच्या मूर्तव्यक्तिरूपास ही गोष्ट पूर्णपणें बाधक आहे हें सांगावयास नकोच. ‘ वृत्रा ’ शीं संबद्ध असलेली कल्पना योग्य रीतीनें समजून घेण्यासाठी ‘ वृत्र ’ या शब्दाचा भाषाशास्त्रदृष्ट्या विचार करणें

जरूर आहे असं मला वाटतं 'वृ' या धातूला 'त्र' हा आगम लागून 'वृत्र' हा शब्द सिद्ध झालेला आहे या 'वृ' धातूचा मूळ अर्थ 'प्रतिबंध करणें' 'अवरोध करणें' असा आहे[२६] म्हणजे 'वृत्रम्'—या नपुसकलिंगी धातुसाधित नामाचा अर्थ 'प्रतिबंध' किंवा 'अवरोध' विशेषत आत्मरक्षणासाठी, बचावाचें धोरण (defensive measure) म्हणून केलेला, 'प्रतिबंध'—असाच मूळचा असला पाहिजे[२७] या प्रतिबन्धाचा नाश करणाऱ्या देवतेची, काहीशा अमूर्त अशा देवतेची, कल्पना प्राचीन आर्यांनी आपल्या दैवतशास्त्रात समाविष्ट केली त्या देवतेच्या प्राचीन इराणी स्वरूपास अवेस्तात वृथ्रघ्न असें संबोधिलें आहे म्हणजे आर्यांच्या मूळच्या दैवतशास्त्रात वृत्र नावाच्या दैत्याचा इन्द्रासारख्या एका सर्वश्रेष्ठ देवाने निःपात केला अशी पुराणकथा अस्तित्वातच नव्हती ती तशी असती तर तिचीं काही चिह्नें अवेस्तातील वृथ्रघ्न या देवतेंत उपलब्ध झालीं असतीं प्राचीन आर्यांच्या वृत्रहन्–वृथ्रघ्न या देवतेंत 'प्रतिबन्धनाशक देवता' एवढीच एक अमूर्त कल्पना अनुस्यूत आहे मूळच्या 'वृत्र वृत्रहन्' या दैवतशास्त्रीय कल्पनेंत मानवीकरणाचा, personification—चा, भाग अगदीच नव्हता

आता मीं जें कांही सांगितलें त्यामुळे माझ्या प्रतिपादनात एक प्रकारचा अन्तर्विरोध निर्माण झाल्यासारखा दिसणें शक्य आहे याची मला जाणीव आहे आर्यांची मूळची 'वृत्रहन्–वृथ्रघ्न' ची कल्पना बव्हंशीं अमूर्त स्वरूपाची आहे असें मीं सांगितलें त्याच्याच अगोदर मीं असें सांगितलें की इन्द्र हा मूलत अतिमानवोचित पराक्रम गाजविणारा मानवी आर्य वीर असला पाहिजे आणि त्या इन्द्राला तर वेदात

(२६) यास्कांनी 'वृत्र' हा शब्द 'वृ' (= आवरण घालणें) 'वृत्' (= अस्तित्वात असणें) आणि 'वृध' (= वाढणं) या धातूपासून साधलेला आहे (नि० २ ५)

(२७) 'त्र' या प्रत्ययाने साधित झालेल्या नामांचा मागील एका व्याख्यानांत थोडक्यांत विचार करण्यांत आला आहेच

'वृत्रहा' हें विरुद् अनन्यसाधारणतया लावलेलें आढळतें. या सर्व गोष्टींची संगति कशी लावावयाची? या प्रश्नाचें उत्तर सूत्रमय पद्धतीने द्यावयाचें झालें तर मी असें म्हणेन की 'वृत्रहन्–वृथ्रग्न' ची देवतशास्त्रीय कल्पना 'आर्यांची' आहे, तर इन्द्र हा मूळचा 'वैदिक भारतीयांचा' वीर नेता असून तद्विषयक देवतशास्त्रीय कल्पना वैदिक भारतीयांनीच निर्माण केली आहे. आणि 'वृत्रहा इन्द्र' ही देवतशास्त्रीय घटना 'आर्य' आणि 'वैदिक भारतीय' देवतशास्त्रांच्या एक प्रकारच्या संकराची परिणति आहे.

या सूत्राचें थोडेसें विस्तारपूर्वक विवरण करणें अत्यंत अवश्य आहे त्यासाठी आपणास वेदपूर्वकालीन इतिहासाचें थोडक्यात अवलोकन करावें लागणार आहे. याविषयी प्रचलित असलेल्या वादाच्या तपशीलांत न शिरतां, त्या बाबतींत माझें स्वतःचें काय मत आहे तें, अगदी थोडक्यांत, मी आपणांपुढे मांडू इच्छितों.[२८] भाषाशास्त्र, मानवेतिहासशास्त्र, पुराणवस्तुसंशोधन, आणि तौलनिक सांस्कृतिक इतिहास या *विद्याशाखांनी उपलब्ध करून दिलेल्या पुराव्यावरून असें अनुमान करतां* येतें की ज्या एका मानवसमूहातून वैदिक आर्य बाहेर पडले, तो मानवसमूह अगदी प्राचीन काळीं, इतिहासपूर्व काळीं, एकत्र असा उत्तर किरघीज प्रदेशात वास्तव्य करीत असला पाहिजे. हा मानवसमूह वंशदृष्ट्या संकीर्ण स्वरूपाचा असला तरी भाषिक दृष्ट्या आणि सांस्कृतिक दृष्ट्या बराचसा एकरूप होता या मानवसमूहास यूरोभारतीय किंवा, अधिक काटेकोरपणाने बोलावयाचें झाल्यास, पूर्वयूरोभारतीय–Proto-Indo-European– हें नांव सामान्यतः देण्यात येतें. या मानवसमूहाच्या सांस्कृतिक इतिहासाच्या अगदी पहिल्या पहिल्या अवस्थेंतच त्याच्यातून एक टोळी बाहेर पडली व कास्पियन समुद्राच्या

[२८] या विषयाच्या विस्तृत विवेचनासाठी प्रस्तुत लेखकाचा पुढील लेख पहा 'The Antecedents and the early Beginnings of the Vedic period". *PIHC*, Bombay 1947, pp 24–55.

उत्तरेच्या बाजूकडून, कॉकेशस पर्वत ओलांडून, पूर्वी आशिया मायनर या नांवाने सामान्यतः ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशांत येऊन ठेपली. या लोकांना लुव्हियन आणि हिटाइट असें नांव आहे. त्यांनी लवकरच या नवीन प्रदेशांत आपली सत्ता व संस्कृति प्रस्थापित केल्याचें ऐतिहासिक पुराव्यावरून दिसून येतें.

पूर्वयुरोभारतीयांच्या इतिहासांतील दुसरी अवस्था आपल्या विवेचनाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाची आहे. या अवस्थेंत मूळ युरोभारतीय मानवसमूहांतून (अर्थात् पहिलें निर्गमन झाल्यावर शिल्लक राहिलेल्या मानवसमूहांतून) दोन मोठ्या टोळ्या बाहेर पडल्या. त्यांपैकी एक टोळी– आधी निर्गत झालेली टोळी–आपल्या मूळच्या वसतिस्थानाच्या आग्नेय दिशेकडे वळली आणि तिने शेवटीं बाल्ख (बाह्लीक) प्रदेशाच्या आसपास वसति केली. (दुसरी निर्गत झालेली टोळी वायव्येकडे गेली आणि तिने युक्रेनच्या उत्तरेस प्रिपेट विभागांत वसति केली. पण त्या टोळीचा इतिहास आपल्या विषयाच्या दृष्टीने प्रस्तुत नसल्यामुळे मी त्याचें येथे विवेचन करीत नाही). पुढील इतिहासाच्या अपेक्षेने, बाह्लीक–Bactria–प्रदेशांत वसाहत केलेल्या युरोभारतीय टोळीला प्राचीन आर्य, किंवा पूर्वार्य –Proto-Aryans– असें नामाभिधान वापरण्यास कांहीच हरकत नाही. या प्रदेशांत वास्तव्य करीत असतांनाच त्या लोकांनी आपल्या पूर्वार्य भाषेचा आणि दैवतशास्त्राचा विशिष्ट प्रकारें विकास केला त्यांची भाषा म्हणजे वैदिक संस्कृत आणि प्राचीन इराणी भाषा या भाषांची पूर्वज. आणि त्याचें दैवतशास्त्र म्हणजे अवेस्तांतील आणि वेदांतील दैवतशास्त्रांचें मूळ! वेदांतील अनेक मन्त्रांचें प्राथमिक स्वरूप येथेच निर्माण झालें असलें पाहिजे. आणि त्यावरच पुढे संस्करण होऊन त्यांना सद्याचें रूप प्राप्त झालें असलें पाहिजे असें, ऋग्वेदाचा भाषाशास्त्रदृष्ट्या अभ्यास केल्यास, प्रत्ययास येण्यासारखें आहे. आपल्या विषयाच्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट म्हणजे दैवतशास्त्रीय 'असुर' कल्पना पूर्वार्यांनी येथेच प्रसृत केली.

तीच पूर्वार्यांची 'असुर' कल्पना पुढे दोन विशिष्ट प्रकारानी–म्हणजे वैदिक 'असुर' वरुणाच्या रूपाने आणि अवेस्तांतील अहुर मज्दाच्या रूपाने– विकास पावली बाह्लीक प्रदेशात पूर्वार्यांची वसति पुष्कळच काळपर्यंत झाली असली पाहिजे–इतक्या काळपर्यंत की पुढे पुढे ते लोक आपलें उत्तर किरघीज प्रदेशांतील यूरोभारतीय मूलस्थान विसरून गेले,आणि वाह्लीक प्रदेशालाच आपलें मूलस्थान मानू लागले या पूर्वार्यांच्या इतिहासाचें संशोधन केलें असतां असें आढळून येतें की त्यांच्या सांस्कृतिक इतिहासाच्या अगदी पहिल्या अवस्थेंत त्यांच्यातून काही टोळ्या फुटून निघाल्या व त्याहि आशिया मायनर प्रदेशात येऊन दाखल झाल्या या टोळ्या म्हणजेच कासाइट, हारी, मिटानी वगैरे लोक होत ! या टोळ्या निर्गत झाल्यानतर शिल्लक राहिलेला पूर्वार्यांचा मोठा मानवसमूह म्हणजेच प्राचीन इराणी व वैदिक भारतीय या लोकांचे पूर्वज !!

प्राचीन इराणी आणि वैदिक भारतीय यांच्या या पूर्वजांस 'आर्य' लोक हें नामाभिधान देणें योग्य सर्वच दृष्टींनी ठरेल. त्यांची भाषा, संस्कृति, देवतशास्त्र हीं सर्व बव्हशीं एकरूप होतीं. पण लवकरच आर्यांच्या या मानवसमूहातूनहि निर्गमनें सुरू झालीं. त्यांतील शातता प्रिय लोक हळूहळू इराणाकडे सरकू लागले त्याना विरोधहि फारसा झाला नाही. आर्यांपैकी अधिक साहसी, उत्साही, महत्त्वाकांक्षी असे जे लोक होते ते मात्र पूर्वेकडे वळले. त्याना अनेक विरोधी मानवसमूहास तोंड द्यावें लागलें पण आपल्या महान् नेत्याच्या नेतृत्वासाठी त्यांनी सर्व विरोधी लोकांचा निपात करून आपली आक्रमणात्मक प्रगति चालू ठेविली—अगदी सप्तसिंधु प्रदेशात येऊन दाखल होईपर्यंत चालू ठेविली आर्यांपैकी आक्रमक असे हे लोक म्हणजेच वैदिक भारतीय लोक आणि त्यांचा महान् नेता म्हणजेच इन्द्र ! आर्यांच्या देवतशास्त्राचें वैदिक भारतीयांच्या देवतशास्त्रांत स्वरूपांतर होत असतां वैदिक भारतीयांनी आपल्या महान् नेत्यास देवत्व देऊन त्याची त्यात सर्वोच्चस्थानीं प्रतिष्ठापना केली आणि, अशा रीतीने, वैदिक देवतशास्त्र इन्द्रप्रधान बनलें !!

राष्ट्रीय नेत्याचा राष्ट्रीय वीर, आणि राष्ट्रीय वीराची राष्ट्रीय देवता–हा दैवतशास्त्रीय विकास सहज आकलनीय असा आहे. इन्द्राचा प्रतियोगी असा देव सामान्यतः इतर कुठल्याहि यूरोभारतीय दैवतशास्त्रांत नाही– विशेषतः प्राचीन इराणी लोकांच्या दैवतशास्त्रांत नाही – याचें रहस्य आता अगदी स्पष्टपणें लक्षांत येईल.[११] आर्य लोक एके ठिकाणीं वास्तव्य

(११) मध्य आशियांत बोगझक्वाय येथे उत्खनन करीत असतां, १९०७ सालीं, ह्यूगो विन्क्लेर यास एक मृण्मुद्रा सापडली. त्यासंबंधींचा उल्लेख मागील एका व्याख्यानांत आलेलाच आहे. त्या मृण्मुद्रेवरील लेखांत हिटाइटांचा राजा आणि मिटानी लोकांचा राजा या दोघांच्यांत खिस्तपूर्व सुमारे १४०० सालीं झालेल्या तहाचा निर्देश आहे. त्या तहाचें साक्षीदार म्हणून चार देवतांचें आवाहन केलेलें आहे त्यांत 'इनरस' ही एक देवता आहे. 'इन्द्र' आणि 'इनरस' हे शब्द भाषाशास्त्रदृष्ट्या निःसंशय संबद्ध आहेत. आता असा प्रश्न उद्भवतो की मिटानी लोकांचा देव 'इनरस' आणि वैदिक भारतीयांचा प्रमुख देव 'इन्द्र' यांचा संबंध काय असावा. याकोबी (*JRAS* 1909, 721–26), विण्टरनित्स (*HIL* I, 306), वगैरे विद्वानांचें असें मत आहे की मिटानी लोक हे वैदिक भारतीयांच्या मधूनच फुटून पश्चिमेकडे आलेले लोक असले पाहिजेत, आणि त्यांचा देव 'इनरस' म्हणजे वैदिक इन्द्राचेंच स्वरूपान्तर असलें पाहिजे. ही उपपत्ति मान्य करण्याने अनेक अडचणी उपस्थित होतात (प्रस्तुत लेखकाचा वरील पद्टीपेंत उल्लेखिलेला लेख पहा) यांविषयी मला सयुक्तिक वाटते ती उपपत्ति अशी : 'इन्द्र', 'इनरस' हे शब्द पूर्वार्यभाषेतील एकाच शब्दापासून व्युत्पन्न झाले असावेत. त्या पूर्वार्य शब्दाचा मूळ अर्थ 'वर्धमानपौरुषयुक्त वीर' असा असला पाहिजे. (पुढे केलेलें 'इन्द्र' या शब्दाचें भाषाशास्त्रीय स्पष्टीकरण पहा.) मिटानी लोक पूर्वार्यांतून वैदिक भारतीयांपूर्वी वेगळे झाले हें मागे सांगितलेंच आहे. ते लोकहि युयुत्सु असल्यामुळे त्यांनी आपल्या स्वतःच्या दैवतशास्त्रांत आपल्या सर्वश्रेष्ठ पराक्रमी नेत्यावर देवत्व आरोपून त्यास 'इनरस' हें सार्थ नामाभिधान दिलें असणें अशक्य नाही. 'इन्द्र' आणि 'इनरस' या देवताकल्पनांचें मूळ असे जे वीर नेते ते भिन्न असल्यामुळे मिटानी लोकांच्या 'इनरस' या देवास वैदिक इन्द्राचा प्रतियोगी समजणें योग्य होणार नाही.

करीत असतां त्यांच्या दैवतशास्त्रांत 'असुर' कल्पना सर्वोन्नत मानली जात होती. त्यामुळे त्या कल्पनेचा वैदिक प्रतिनिधि असुर वरुण यास वैदिक दैवतशास्त्राच्या प्राथमिक अवस्थेंत सर्वोन्नत स्थान प्राप्त झालें होतें. पण वर वर्णिलेल्या घटनेनंतर असुर वरुणास साहजिकपणेंच वैदिक भारतीयांची नवीन राष्ट्रीय देवता, इन्द्र, हिने स्थानभ्रष्ट केलें

'असुर' कल्पनेबरोबरच दुसरी एक कल्पना पूर्वार्यांच्या दैवतशास्त्रांत निर्माण झाली होती. ती म्हणजे 'वृत्र–वृत्रहा'ची. मागे सांगितल्याप्रमाणे ही कल्पना बहुशीं अमूर्त स्वरूपाची अशी होती, आणि प्राचीन इराणी लोकांच्या दैवतशास्त्रांत ती तशीच राहिली. पण वैदिक भारतीयांच्या दैवतशास्त्रांत त्या अमूर्त कल्पनेस एक प्रकारचें मूर्त स्वरूप प्राप्त झालें असें म्हटलें पाहिजे कारण त्यांच्या बाबतींत 'वृत्र' म्हणजे 'प्रतिबन्ध', 'अवरोध'— यथार्थाचें धोरण म्हणून केलेला प्रतिबन्ध— मूर्त स्वरूपांत निर्माण झाला होता[30] तसेंच त्या मूर्त मानवी-प्रतिबन्धाचा, अवरोधाचा, नाश करणारा वीर नेता त्यांच्यात निर्माण झाला होता. आणि त्या वीरालाच 'वृत्रहा' हें बिरुद विशेषत्वाने शोभण्यासारखें होतें आर्यांची अमूर्त अशी 'वृत्रहा'ची कल्पना भारतीयांच्या मूर्त अशा इन्द्राशीं संबद्ध होऊन मूर्तत्व पावली, आणि 'वृत्रहा इन्द्र' निर्माण झाला !

वैदिक भारतीयांच्या वीर नेत्याचें नाव अत्यंत उचित असेंच होतें असें म्हणावयास पाहिजे 'इन्द्र' या शब्दाचा भाषाशास्त्रीय विचार आतापर्यंत अनेक विद्वानांनी केलेला आहे[31] इन्द्र म्हणजे सूर्यदेवता या

(३०) काहीं विद्वानांच्या मतें 'वृत्र' हें वैदिक भारतीयांनी पराभूत केलेल्या एका विशिष्ट प्राचीन भारतेतर जमातीचें नाव होतें (पहा· *ABORI* XXX, 163 ff.) पण वरील विवेचन ध्यानांत घेतल्यास, विशेषतः 'वृत्राणि' हें नपुंसकलिंगी रूप लक्षांत घेतल्यास, 'वृत्र' हें एखाद्या विशिष्ट जमातीचें नाव असेल हें समजनीय दिसत नाहीं

(३१) यास्कांनी 'इन्द्र' हा शब्द तेरा निरनिराळ्या प्रकारांनी साधला आहे

उपपत्तीशीं जुळण्याकरिता, 'इन्द्र' हा शब्द 'इन्धू' (= पेटविणें, प्रकाशणें, प्रकाशित करणें) या धातूपासून साधण्याचा कांहीं पंडितांनी प्रयत्न केलेला आहे.[३१] दुसऱ्या कांहीं पंडितांनीं 'इन्द्र' हा शब्द भाषाशास्त्रदृष्ट्या 'इन्दु' या शब्दाशीं सदृश असल्याचें सुचवून इन्द्राचा पर्जन्यविद्वंशीं (किंवा सोमविंद्वंशीं) संबंध जोडला आहे.[३३] 'इन्द्र' या शब्दाची व्युत्पत्ति 'इद्', 'इन्द्' (= उत्तेजित करणें) या धातूपासून झाली असावी असें रोट याचें मत आहे. मला असें वाटतें की 'इन्द्र' आणि 'इन्दु' हे शब्द भाषाशास्त्रदृष्ट्या निःसंशय संबद्ध आहेत. पण येथें 'इन्दु' या शब्दाचा मूळचा अर्थ ध्यानांत घ्यावयास हवा. 'इन्द्र' आणि 'इन्दु' हे दोन्ही शब्द यूरोभारतीय *oid या शब्दाशीं संबद्ध आहेत, आणि त्या यूरोभारतीय शब्दाचा पुढें विकसित झालेला अर्थ 'वर्धमान पौरुष', 'वर्धमान पुरुषवीर्यबिन्दु' असा आहे.[३४] 'इन्द्र' या नांवानें वैदिक भारतीयांच्या नेत्याच्या पौरुषाचा —पौंस्याचा—गौरव झालेला आहे. *oid या यूरोभारतीय शब्दाच्या विकसित रूपाचा, कल्पनासादृश्यामुळें, यूरोभारतीय *ənro (= वैदिक भाषेंतील 'नृ'

---

(३१) रोट या विद्वानानें 'इन्द्र' हा शब्द 'इन्धू' या धातूपासून प्रथम व्युत्पादिला होता (*ZDMG* 1847, 72 ff). बेर्गेन्य (II, 166), ग्रासमान, व बोलेन्सेन (*ZDMG* 41, 505) या पंडितांनीं देखील ही व्युत्पत्ति स्वीकारली आहे पण रोटनें आपलें मत पुढें बदललें. बेनफे यानें 'इन्द्र' या शब्दाचा 'स्यन्द्' या धातूशीं संबंध असावा असें सुचविलें आहे. या विषयावरील पुढील लेख पहा: V. M. Apte. "The Name 'Indra'—an Etymological Investigation.". *J Bom U* XIX, 13–18.

(३३) मॅक्स म्यूलर, मॅक्डोनेल (*V.M.* 66) या पंडितांनीं ही व्युत्पत्ति सुचविली आहे.

(३४) Güntert. *Der arische Weltkönig*, 13–14.

'नर') या शब्दाशीं[३५] भाषाशास्त्रीय संकर होऊन इन्द्र हा शब्द सिद्ध झाला असणें अशक्य नाहीं. सारांश, इन्द्राच्या मूळ व्यक्तिमत्त्वाविषयी जें विवेचन मीं आतापर्यंत केलें त्याला 'इन्द्र' या शब्दाच्या वर दर्शविलेल्या व्युत्पत्तीने पुष्टीच मिळते

इन्द्राने ज्यांचा निःपात केला त्या वैदिक भारतीयांच्या शत्रूंचा दास, दस्यु, वृत्र अशा अनेक नांवांनी ऋग्वेदांत उल्लेख केला गेला आहे. त्यातल्या त्यात, त्याना उद्देशून, 'वृत्राणि' हें सामान्य स्वरूपाचें नाव वारंवार वापरलेलें आहे. तसेंच, त्या सर्व शत्रूंचा वाचक असा, प्रतीकरूपानें, पुल्लिंगी एकवचनी 'वृत्र' हा शब्दही कधी कधी वापरला आहे. वैदिक आर्यांच्या या सर्व शत्रूंचा इतिहास देण्याची येथे आवश्यकता नाहीं.[३६]

(३५) JACOBI KZ XXXI, 316 ff.

(३६) वैदिक भारतीयांचे हे शत्रु एकाच जमातींतील होते असें समजून चालणार नाही. ऋग्वेदांत सामान्यपणें केलेल्या त्यांच्या वर्णनावरून ते लोक शारीरिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या वैदिक आर्यांपेक्षा पुष्कळच भिन्न असावेत असे अनुमान करतां येतें. ते लोक कृष्ण वर्णाचे (१ १३० ८; २ २० ७), व बसक्या नाकाचे (५ २९ १०) होते. त्यांची भाषा अस्पष्ट व असंस्कृत होती (१ १७४ २, ५ २९.१०). त्यांचा उल्लेख 'अनिंद्र' (४.२३.७; ७ १८ १६), 'अयज्वन्' (१ ३३ ४; ७ ६ ३), 'अदेव' (३ ३१.१५; ८ ७० ११) या शब्दांनी केलेला आहे. या शत्रूंनी वैदिक आर्यांच्या गोधनाचें अपहरण केलें (१ १२ ३, ३ ३०.१०) नद्या अडवून धरल्या (१ ३२ १२; २ १२ ३), पर्वतांतील आपल्या गुप्त स्थानांतून किंवा पुरांतून त्यांवर हल्ले केले (१ १२०.११; २ १४.१६; ८ १७ १४) - अशा प्रकारचीं वर्णनें ऋग्वेदांत वारंवार आलेलीं आहेत. ऋग्वेदांत वैदिक भारतीयांच्या या विरोधकांचा 'दास', 'दस्यु', 'वृत्र', अशा शब्दांनी सामुदायिक रीतीने जरी सामान्यतः उल्लेख केलेला असला तरी कांहीं विशिष्ट व्यक्तींपैकी कांहींचा अर्बुद (१ ५१ ६), इलीबिश (१.३३.१२), धुनि (६ २६ ६), वर्चिन् (२ १४ ३), रौहिण (२ १२ १२) असा

[पान ९७ वर पहा]

जाता जाता येवढें मात्र सांगावेसें वाटतें कीं केवळ वृत्राशीं — आर्यांच्या शत्रूशीं — होणाऱ्या युद्धातच साहाय्य मिळावें म्हणून वैदिक कवींनीं इन्द्राचें आवाहन केलें आहे असें नसून, एका आर्यसमूहाचें दुसऱ्या आर्यसमूहाशीं युद्ध होत असताहि, त्यापैकीं एकाने — किंवा, काहीं प्रसंगीं, दोघानीहि — इन्द्राचें नेतृत्वासाठीं आवाहन केल्याचें प्रत्ययास येतें (१ ७ ५, ६ २५ ६, २६ २, ४६ १, ७ ३४ ३) इन्द्राच्या ऐतिहासिकतेला पोषक असा हा चागलाच पुरावा उपलब्ध आहे

इन्द्राने नि पात केलेल्या वैदिक भारतीयाच्या शत्रूचा इतिहास देण्याची आवश्यकता नाही असें मीं आता म्हटले पण या संदर्भात इन्द्राच्या एका विशेष बिरुदाची येथे थोड्याशा विस्ताराने चर्चा करणें अप्रस्तुत होणार नाही ऋग्वेदीय इन्द्रास 'पुरन्दर' असें संबोधिलेलें आहे इन्द्राने आपल्या शत्रूचा नि पात करताना जर कोणतें वैशिष्ट्य पूर्ण वीरकर्म केलें असेल तर तें म्हणजे आपल्या शत्रूच्या पुराचा नाश करणें हें होय (१ ५१ ५, २ १४ ६, ८ १७ १४) हीं पुरें कोणतीं ?

[पान ९६ वरून चालू]

व्यांकेशाहि उल्लख करेला आढळता इन्द्रानें या सर्वांचें पारिपत्य करून मिळविलेल्या विजयासंबधीचे वैदिक उल्लेख अक्षरश असंख्य आहेत हिलेब्रान्ने असें मत प्रदर्शित केलें आ० (*V M* III, 268 ff) या 'दास' हें मूळच एका विशिष्ट भौगोलिक प्रदेशाचें व तेथे राहणाऱ्या लोकाचें नांव होतें हे लोक आर्यांचे शत्रु होत उत्तरकालीं 'दास' या विशिष्ट नामाचा सामान्यनामाप्रमाणे उपयोग व्हावयास लागला आणि आर्यांच्या सर्वच शत्रूना दास असें म्हणण्यात येऊ लागलें (अर्थविकासक्रमातील याच्या पुढची पायरी म्हणजे पराभूत झालेल्या शत्रूना सेवक करण्यात आलें व दास म्हणजे सेवक किंवा गुलाम असा अर्थ रूढ झाला परंतु ऋग्वेदात दास शब्द गुलाम या अर्थी केवळ तीनदा वापरलेला दिसतो) 'दास' आणि 'दस्यु' हे शब्द मूळचे निरनिराळ्या लोकांचे वाचक असावेत असें अनुमान करता येणें शक्य आहे हिलेब्रान्ट्या मतें आर्य-दास-संघर्ष हा राजकीय स्वरूपाचा होता, तर आर्य-दस्यु-संघर्षाचें स्वरूप धार्मिक होतें

यासंबंधी एक उपपत्ति मीं कांहीं वर्षांपूर्वी पुढें मांडली होती.[३७] वैदिक आर्यांची संस्कृति ही आक्रमक, युयुत्सु, अस्थिरवासी (nomadic) लोकांची संस्कृति होती याच्या उलट, कांहीं वर्षांपूर्वी सिन्धुनदाच्या खोऱ्यांत, मोहेंजोदरो आणि हराप्पा येथे उत्खनन करून, प्रकाशांत आणली गेलेली प्राचीन सैन्धवी संस्कृति ही स्थिरवासींची वणिक् संस्कृति असावी असा तर्क करतां येतो. या सैन्धवी संस्कृतीच्या लोकांच्या वसाहती दुर्गप्राकारादि साधनांनी सुरक्षित होत्या, fortified होत्या, पुरांच्या स्वरूपाच्या होत्या. त्या संस्कृतीचा खोलवर अभ्यास केल्यास ती आर्यपूर्वकालीन – वेदपूर्वकालीन – असावी असें निश्चित वाटू लागतें वैदिक भारतीयांनी, इन्द्राच्या नेतृत्वाखाली, त्या संस्कृतीच्या शेवटच्या अवस्थेंत तिचा नाश केला—त्या लोकांचीं पुरें उध्वस्त केलीं आणि म्हणून इन्द्राला ‘पुरन्दर’ हे अभिमानास्पद बिरुद वैदिक कवींनीं अर्पण केलें.[३८] मीं सुचविलेल्या वरील उपपत्तीस एक स्वतंत्र असा आधार अलीकडेच पुराणवस्तुसंशोधनखात्याकडून मिळाला आहे. त्या खात्याचे माजी प्रमुख डॉ. व्हीलर यांनी, गेल्या वर्षी, हराप्पा येथील नवीन उत्खननाविषयी लेख प्रसिद्ध केलेला आहे आणि त्यांतहि त्यांनी अशीच उपपत्ति सुचविली आहे.[३९]

---

(३७) *ABORI* XXI, 34.

(३८) एका अर्थी हीं पुरें म्हणजे सैन्धवी लोकांनी आत्मसंरक्षणासाठी निर्माण केलेले प्रतिबन्ध– किंवा ‘वृत्र’ च– होत. या दृष्टीने पाहिलें असतां ‘पुरन्दर’ आणि ‘वृत्रहा’ हे शब्द जवळजवळ एकाच अर्थाचे आहेत असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

(३९) R. E. M. Wheeler. “Harappā 1946: The Defences and Cemetery R.37.” *Ancient India* 3,58–160. ऋग्वेदांत वर्णिलेले कृष्णवर्णाचे, बसक्या नाकाचे, पुरांत राहणारे दास-दस्यु म्हणजे हराप्पाचे वेदपूर्वकालीन रहिवासी असावेत, कारण त्या रहिवाशांत proto-Australoid जातीचे अनेक लोक होते, असें मत पिगॉट (*Prehistoric India*, 261) यानें प्रदर्शित केलें आहे.

हा ऐतिहासिक विषय बाजूला ठेवून पुन्हा आपण वैदिक दैवतशास्त्राकडे वळूं. मागील व्याख्यानांत सांगितलेंच आहे की प्राचीन इराणी लोकांचे आणि वैदिक भारतीयांचे पूर्वज बाल्हीक प्रदेशांत एकत्र वास्तव्य करीत असतां — म्हणजेच 'आर्य' काळीं — त्यांच्या दैवतशास्त्रांत असुर ऋत-कल्पना हीच प्रमुख मध्यवर्ती कल्पना म्हणून मानिली जात होती. आर्यांच्या सांस्कृतिक इतिहासाच्या एकंदर विकासक्रमाशीं पूर्णपणें जुळणारी अशीच ती कल्पना होती हेंहि मागें सुचविलेंच आहे. या आर्य लोकांतील साहसी, महत्त्वाकांक्षी, आणि युयुत्सु वृत्तीच्या जमाती पुढें सप्तसिन्धु प्रदेशाकडे वळल्या. आणि त्यांनी आपल्या नवीन जीवनक्रमास व विचारपद्धतीस अनुरूप असें इन्द्रप्रधान दैवतशास्त्र निर्माण केलें अर्थात् त्यांच्यापैकी कांहीं लोक अद्यापीहि आपल्या पूर्वजांच्या असुरधर्माशीं एकनिष्ठ राहिले होते. याचा परिणाम असा झाला की वैदिक दैवतशास्त्रात प्राचीन असुरवरुणप्रधान पंथ आणि नवीन इन्द्रप्रधान पंथ असे दोन पंथ स्पष्टपणें दिसूं लागले. अनेक ऋग्वेदीय सूक्तांतून ऐकूं येणारे वरुण आणि इन्द्र यांच्यामधील विरोधाचे सूर उपर्युल्लिखित घटनेचेच द्योतक आहेत. त्या सूक्तांचा चिकित्सक रीतीने अभ्यास केला तर इन्द्रधर्माने असुरधर्मावर शेवटीं यशस्वी आक्रमण केलें असेंच दिसून येतें.[४०] या संदर्भात ऋग्वेदांतील चवथ्या मंडलांतील बेचाळीसावें सूक्त अत्यंत सूचक असें आहे. वैदिक देवतामण्डलांतील सर्वश्रेष्ठपदासाठीं इन्द्र आणि वरुण या दोन देवांमध्ये चाललेल्या स्पर्धेचा निकाल त्या सूक्तांत निरपवादपणें इन्द्राच्या बाजूनेच दिला गेला आहे. दुसऱ्या एका सूक्तांत (१०.१२४) वरुणाचें पद इन्द्राकडे गेल्याचें

(४०) सैन्धवी संस्कृति ही अनेक दृष्टींनी प्राचीन असीरियन किंवा 'असुर' संस्कृतीशीं सदृश अशी होती. इन्द्राच्या नेतृत्वाखालीं वैदिक भारतीयांनी या 'असुर' सदृश सैन्धवी संस्कृतीचा निपात केला ही ऐतिहासिक घटना इन्द्रप्रधान दैवतशास्त्राने असुरप्रधान दैवतशास्त्राचा मात केली या दैवतशास्त्रीय घटनेच्या दृष्टीने परिणाम साहाय्यभूत ठरली असणें असमवनीय नाही.

प्रतिपादिलें आहे की प्राचीन भारतीय आणि इराणी लोक एकत्र राहत असता त्याच्यात धार्मिक वैतुष्ट्य निर्माण झालें, आणि त्यामुळेच ते एकमेकापासून निराळे झाले याचा परिणाम असा झाला की इराण्याचा देव जो 'असुर' त्याला भारतीय लोक दैत्य समजू लागले, व भारतीयाचा देव जो इन्द्र त्याला इराणी लोक दैत्य समजू लागले हाउगची ही उपपत्ति–किंबहुना वर उल्लेखिलेल्या सर्वच उपपत्ति–फारशा प्रत्ययदायी नाहीत हें सांगावयास नकोच माझ्या मतें उपर्युक्त दैवतशास्त्रीय घटनेस दोन कारणें संभवतात शांतताप्रिय, नीतिवादी, असुरधर्मानुयायी अशा प्राचीन इराणी लोकाना साहसी, आक्रमक, इन्द्रधर्मानुयायी अशा भारतीयाची सांस्कृतिक वृत्ति मान्य नव्हती त्यामुळे आर्य लोकसमूहात प्रथम भेद पडून प्राचीन इराणी आणि वैदिक भारतीय हे दोन लोक निरनिराळ्या मार्गास लागले पुढे वैदिक दैवतशास्त्रात इन्द्रधर्माने वरुणधर्मावर मात केली असें मी मागे सांगितलेंच आहे त्याचीच प्रतिक्रिया 'असुर' धर्मानी उत्तरकाली इन्द्रावर दैत्यस्वरूपाचा आरोप करण्यांत झाली असावी हें पहिलें कारण' आणि या प्रतिक्रियेच्या परिणामावर अवस्तांतील काही कवींनी, वैयक्तिक रीत्या, विशेष भर दिला हें दुसरें कारण''

आक्रमणशील वैदिक भारतीयाचा नेता–त्याचा राष्ट्रीय वीर–आणि, शेवटी, त्याची सर्वश्रेष्ठ राष्ट्रीय देवता–या दैवतशास्त्रीय विकासक्रमांतून प्रगत होऊन, वैदिक दैवतशास्त्रात अप्रतिहत वर्चस्व प्रस्थापित केलेल्या इन्द्रदेवतच्या व्यक्तिमत्त्वात पुढे आणखी काही अश समाविष्ट झाले त्याचा थोडक्यांत उल्लेख करून हें इन्द्राचे चरित्र मी पूर्ण करणार आहें एखाद्या मानवी वीराला देवत्व प्राप्त होणें अशा घटनेच्या पहिल्या अवस्थेंत त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वांत मानवी अशाचें प्राधान्य कायम राहतें. पण पुढे पुढे, मानवी अश मागे पडून, ज्याना वैश्विक–cosmic–म्हणता येईल, असे अश त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वांत विष्ट केले जातात 'वृत्रहा' इन्द्र हा प्रथम मानवी 'वृत्रां चा

निपातकर्ता होता. त्यालाच पुढे वैदिक कवींनी cosmic–निसर्गातील–'वृत्रा'चा निपातकर्ता बनविलें. इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांत पर्जन्यदेवतेचे काही अंश दिसून येतात त्याचें कारण हेंच.[४१] मानवी वीर इन्द्र हा पर्जन्यदेवता समजला गेल्यावर त्याने मूळच्या पर्जन्यदेवतेला–त्रित आप्त्याला–स्थानभ्रष्ट करावें हें ओघानेच प्राप्त होतें.[४२]

याच संदर्भात, इन्द्राला 'मरुत्वान्' असें बिरुद कां प्राप्त झालें असावें याचा थोडक्यांत विचार करणें उद्बोधक ठरेल. मरुतांस उद्देशून रचिलेलीं जीं सूक्तें ऋग्वेदांत आलीं आहेत, त्यांचा सूक्ष्म आणि विश्लेषणात्मक अभ्यास केल्यास असें दिसून येईल की मरुद्गणाचा–आणि या देवता नेहमीच 'गण' स्वरूपांत आविर्भूत झाल्या आहेत–मूळ संबंध रुद्रदेवतेशीं होता. 'रुद्रिय' हेंच खरोखर मरुतांचें त्याच्या मूळ स्वरूपाशी जुळणारें वर्णन! रुद्र या देवतेच्या मूळ व्यक्तिमत्त्वाविषयी अनेक उपपत्ति वेदाभ्यासकांनी पुढे मांडल्या आहेत. पण, माझ्या मतें, रुद्र ही वैदिक देवतशास्त्रांतील मूळची मृत्युदेवता–god of death–असावी. मरुतांचा एक 'गण', किंवा 'शर्ध', म्हणजे एक व्यवस्थित संघटना होती असें आता सुचविलेंच आहे. मुळांत हे मरुत् रुद्राचे–म्हणजे मृत्युदेवतेचे–दूत असावेत.[४३] पुढे रुद्राचें मृत्युदेवतास्वरूप मागे पडलें, आणि त्याचा परिणाम मरुतांच्याहि मूळ स्वरूपावर झाल्यावाचून राहिला नाहीं. मरुतांच्या मूळ स्वरूपाचा

---

(४१) एखाद्या भयंकर युद्धाची आठवण करून देणारी निसर्गातील घटना म्हणजे प्रभंजन आणि पर्जन्यवृष्टि हींच आहे. युद्धदेवता असलेल्या इन्द्रावर पर्जन्यदेवतास्वरूपाचा आरोप केला गेला त्याचें हें एक कारण असावें.

(४२) इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांत इतर कांही निसर्गशक्तींचेहि अंश दिसून येतात.

(४३) 'मरुत्' या शब्दाची व्युत्पत्ति 'मृ' (=मरणें) या धातूपासून झाली असणें अशक्य नाहीं.

एका विशिष्ट रीतीने सुचविलें आहे. ऋग्वेदांतील बहुसंख्य सूक्तें या देवतशास्त्रीय अवस्थेचीच निदर्शक आहेत अर्थात् कांहीं ऋषींनी इन्द्रधर्म आणि वरुणधर्म या दोहोंत समेट घडवून आणण्याचा बराचसा यशस्वी प्रयत्न केला ( ७.८२.२; ८४.२; ८५.३ ) हेंहि मागील व्याख्यानांत सांगितलेंच आहे.

इन्द्रप्रधान देवतशास्त्रांत अनुस्यूत झालेल्या दुसऱ्या एका कल्पनेचा उगम 'आर्य'कालांत झालेला दिसतो. प्राचीन इराणी लोक आणि वैदिक भारतीय यांचे पूर्वज बाह्लीक प्रदेशांत एकत्र राहत असतांना त्यांनी सोम-हाओम या वनस्पतीच्या रसाशीं संबद्ध असलेले धर्मविधि प्रचारांत आणले होते यातुप्रधान धर्मविधींत कांहीं विशिष्ट प्रकारच्या मनिजनांना अवश्य वाटणारा गूढ स्वरूपाचा उन्माद निर्माण करण्याची शक्ति सोमरसांत आहे, हें आर्यांनी जाणलें होतें पुढे वैदिक भारतीयांच्या मध्ये इन्द्र हा वृत्रसंहारक मानवी वीर निर्माण झाला व त्याने निरनिराळीं प्रचंड वीरकर्मे करतांना आपल्या अंगात असह्य चैतन्य निर्माण व्हावें, शौर्योन्माद उत्पन्न व्हावा, यासाठी सोमरसपान करण्यास प्रारंभ केला. मूळ magico-ritualistic हेतूसाठी उपयोजिल्या जाणाऱ्या सोमाचा उपयोग आता एका अर्थी secular हेतूसाठी होऊं लागला असें म्हणावयास हरकत नाही. इन्द्राच्या सोमविषयक अभिरुचीचें वर्णन वैदिक कवींनी ऋग्वेदांत वारंवार आणि अनेक प्रकारांनी केलें आहे ( २.१५.१. ६.४७.१; ७.२२.९; ८.४.१० ) 'सोमपा' हें इन्द्राचें वैशिष्ट्यनिदर्शक असें विरुद बनलें. अर्थात पुढे इन्द्रास देवत्व प्राप्त झाल्यावर सोमाचें तात्पुरतें secular स्वरूप नाहींसे होऊन त्यास पुन्हा देवतशास्त्रीय प्रतिष्ठा प्राप्त झाली असें म्हटलें पाहिजे.

• तात्त्विक देवतशास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाच्या अशा आणखी एका प्रश्नाचा या ठिकाणीं विचार करणें योग्य होईल अवेस्तांत वृथ्रघ्न हें देवता अस्तित्वांत आहे—अमूर्त स्वरूपाची देवता म्हणून अस्तित्वांत

आहे. त्याबरोबरच, अवेस्तांतील दैवतशास्त्रांत Andra ( आन्द्र ) नांवाचा एक दैत्यहि अस्तित्वांत आहे. ही घटना कशी घडून आली असावी ? 'वृत्रहा इन्द्र' या सर्वश्रेष्ठ वैदिक देवतेचा 'वृत्रहा' हा अंश, अवेस्ताच्या दैवतशास्त्रांत, देवतारूपाने दिसून येतो, आणि 'इन्द्र' हा अंश मात्र दैत्यरूपाने समाविष्ट केला गेला या दैवतशास्त्रीय चमत्काराचें कारण काय असावें ?

अवेस्तांतील वृथ्रघ्न हा पूर्वार्यांच्या 'वृत्रहा' कल्पनेचा विकास आहे, आणि म्हणून तो मूळच्या देवतास्वरूपांत राहला. इन्द्र हा वैदिक भारतीयाचाच स्वतंत्र असा नेता—वीर—देव होता. त्या वीराला अवेस्ताधर्मीय प्राचीन इराणी लोकांची मान्यता नव्हती. ते लोक आपल्या मूळच्या 'असुर' धर्मालाच चिकटून राहिले. त्या धर्माचाच त्यांनी आपल्या विशिष्ट पद्धतीने विकास केला. वैदिक इन्द्राला अवेस्तात दैत्यरूप प्राप्त झालें या घटनेचीं अनेक कारणें विद्वानांनी पुढे मांडली आहेत. अवेस्ताच्या अगदी नंतरच्या भागांत या आन्द्र दैत्याचा उल्लेख आलेला आहे. त्यावरून असें अनुमान करतां येणें शक्य आहे कीं तो वैदिक इन्द्राचा निदर्शक नसून, कांहींसें अधःपतित व्यक्तिमत्त्व असलेल्या पुराणवाङ्मयांतील इन्द्राचा निदर्शक असावा. नीतिमत्तेच्या दृष्टीने उन्नत असलेल्या अवेस्ताधर्मांत पुराणांतील इन्द्रास दैत्य समजण्यांत आलें यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांही नाही. वैदिक भारतीयाचा इन्द्र हा सोमपानाचा आत्यंतिक अभिलाषी होता ही वस्तुस्थिति नैतिक शुचिर्भूततावादी — puritanic — इराणी लोकांना मान्य होण्यासारखी नव्हती, म्हणून त्यांनी इन्द्रास दैत्यस्वरूप दिलें असावें अशीहि एक उपपत्ति या बाबतींत पुढे मांडलेली आहे. इन्द्र म्हणजे पर्जन्यदायी शक्ति भारतात योग्य कालीं पर्जन्यवृष्टि करते, म्हणून ती तेथे देवतास्वरूप, पण तीच शक्ति इराणांत अकालीं—म्हणजे हिमऋतूत—वृष्टि करते आणि त्यामुळे रोगराई पसरविते म्हणून तेथे ती दैत्यस्वरूप—असें मे या विद्वानाचें मत आहे

विकास निराळ्या रीतीने होऊं लागला. या विकासाच्या प्रक्रियेंत मरुतांच्या 'गण' या विशेषावर—त्यांच्या संघटनेवर—विशेष भर दिला जाऊं लागला. त्यांच्या या संघटनेवरून वैदिक कवींच्या मनांत एक तत्सदृश कल्पना साहजिकपणेंच स्फुरली—आणि ती म्हणजे सैनिकांच्या संघटनेची. या नवीन कल्पनेला अनुसरून वैदिक कवींनी मरुतांचा संबंध आपली राष्ट्रीय रणदेवता इन्द्र हिच्याशीं जोडला, आणि त्यामुळे इन्द्र '*मरुत्वान्*' बनला. पुढे इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वांत पर्जन्य-देवतासंबद्ध अंश समाविष्ट झाले त्यावेळीं मरुतांच्या स्वरूपांतहि त्या घटनेस अनुरूप असा बदल झाला. मरुतांना निसर्गशक्तिस्वरूप प्राप्त झालें, आणि *मरुत् हे प्रभंजनाचे निदर्शक देवगण आहेत अशी कल्पना* प्रसृत झाली.

वर उल्लेखिलेल्या इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वविकासविषयक प्रक्रियेचें दुसरें स्वरूप म्हणजे असे: वैदिक भारतीयाचा मूळ नेता एकच होता, व त्यासच क्रमाने देवत्व प्राप्त झालें. पण त्यानंतरहि भारतीयाचे जे अनेक नेते निर्माण झाले असले पाहिजेत त्यांनी केलेल्या वीरकर्मांचा संबंधहि त्या मूळ नेत्याशींच लावला जाऊं लागला. म्हणजेच मूळ इन्द्रानतर अनेक 'इन्द्र' निर्माण झाले, आणि त्या सर्वांचें प्रतीकरूपाने मूळच्या इन्द्रांत दैवतशास्त्रीय एकीकरण झालें. पुन्हा सूत्रमय भाषेचा अवलंब करावयाचा झाला तर असें म्हणता येईल की इन्द्र ही मूळची व्यक्ति होती, तिचें दैवतशास्त्रीय संस्थेंत रूपान्तर झालें तसेंच, इन्द्र-वृत्र-संघर्षाचें ऐतिहासिक स्वरूप नाहींसें होऊन त्याला जेव्हा दैवतशास्त्रीय स्वरूप प्राप्त झाले तेव्हा त्यासंबंधींच्या कल्पनेचा प्राचीनपुराणान्तर्गत अशा दुसऱ्या एका सदृश कल्पनेशीं समन्वय करण्यांत आला ती कल्पना म्हणजे वीर आणि अहि किंवा सर्पस्वरूपी राक्षस—Hero and the Dragon—यांच्यामधील संघर्षाची. अशा प्रकारची कल्पना जवळजवळ प्रत्येक प्राचीन पुराणशास्त्रांत अस्तित्वांत असलेली दिसून येते. झ्यूस आणि टायफून हर्क्यूलीस आणि हैड्रा; अपोलो आणि पायथन, मरडुक

आणि तिआमुत; गिलगामिष आणि हुंबाब–या इतर प्राचीन पुराणांतील वीर आणि अहि यांच्या जोड्यांप्रमाणेच वैदिक कवि इन्द्र आणि वृत्र या जोडीसहि मानूं लागले. ऋग्वेदांत वृत्रास आणि इतर इन्द्रशत्रूंस 'अहि' असें संबोधिलें आहे याचें कारण हेंच."

वैदिक इन्द्राच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास हा असा झालेला आहे. पराक्रमी मानवी वीराची राष्ट्रदेवता बनली ही त्या विकासक्रमांतील पहिली पायरी. त्या राष्ट्रदेवतेस वैश्विक स्वरूप देतांना तिच्या व्यक्तिमत्त्वांत पर्जन्यदेवतासंबद्ध कांहीं अंश समाविष्ट करण्यांत आले ही दुसरी पायरी. आणि अशा देवतेचा इतर प्राचीन पुराणशास्त्रांतील सदृश कल्पनांशीं समन्वय करण्यांत आला ही तिसरी पायरी. एवंगुणविशिष्ट इन्द्रानेंच ऋग्वेदीय वाङ्मयावर फार मोठा प्रभाव गाजविला आहे– आणि म्हणूनच वैदिक देवतशास्त्र इन्द्रप्रधान बनलें आहे.

वेदोत्तर देवतशास्त्रांत मात्र इन्द्राचें माहात्म्य बरेचसें कमी झालें, आणि दुसऱ्या एका, वैदिक देवतशास्त्रांतीलच, पण कनिष्ठ श्रेणीच्या, देवतेनें त्याच्यावर मात केली. त्या देवतेचें नांव 'शिपिविष्ट' विष्णु!

---

(४४) इन्द्र अहि-संघर्ष हें 'आर्य' लोक आणि 'नाग' लोक यांच्यामधील ऐतिहासिक संघर्षाचें देवतशास्त्रीय प्रतीक असावें असें कांहीं विद्वानांचें मत आहे (KARMARKAR. *NIA* V, 184-89; RÖNNOW. *AO* XVI, 161-80; OJHA. *JBORS* 28, 55-64).

# परिशिष्ट

## व्याख्यान तिसरें

### 'वृत्रहा' इन्द्र

ऋ १ ५२ ५ वेष्टेप होऊन पर्जन्यवृष्टिप्रतिबंधक (दैत्यानीं) लढत असतां त्याच्या (इन्द्रा)कडे उताराकर वेगाने वाहणाऱ्या नद्यांप्रमाणे (वेगानेच) मदती येऊं लागल्या सोमपानामुळे धृष्ट झालेल्या वज्रभृत् इन्द्राने त्रिताप्रमाणे वलाच्या भोंवतालचे दुर्ग फोडून टाकले

ऋ ४ ४२ ७ . विदुष्टे विश्वा भुवनानि तस्य

ता प्र ब्रवीषि वरुणाय वेध ।

(हे इन्द्रा,) सर्व लोकांना तुझें हें कर्तृत्व माहित आहे (आणि त्यानीं तें अत्यंत गौरवास्पद असें मानिलें आहे) (आता देखील) वरुणाला तू हेंच सांगितलेंस (व पटविलेंस)

ऋ १० १२४ ३ शंसामि पित्रे असुराय...

अग्नि म्हणतो (आता) मी असुर पित्याची (वरुणाची) रजा घेतों

ऋ १० १२४ ४ बह्वीः समा अकरमन्तरस्मि--

न्निन्द्रं वृणान पितरं जहामि।

अग्नि म्हणतो मीं यथे पुष्कळ वर्षे काढलीं (आता) मीं

इन्द्राचा स्वीकार केला आहे, (आणि म्हणून) पित्याचा (वरुणाचा) त्याग करतों.

ऋ. ७ ८२ २ : सम्राळन्यः स्वराळन्य उच्यते वां
महान्ताविन्द्रावरुणा महावसू ।

हे महान् वसुसंपन्न इन्द्रावरुणहो, तुम्हांपैकी एकाला (वरुणाला) सम्राट् (= वैश्विक ऋताचा शास्ता) म्हणतात, आणि दुसऱ्याला (इन्द्राला) स्वराट् (= पृथ्वीचा अधिराजा) म्हणतात.

ऋ. ७ ८४.२ : परि नो हेळो वरुणस्य वृज्या
उरुं न इन्द्रः कृणवदु लोकम् ।

(ऋताचें किंवा नीतीचें उल्लंघन केल्यामुळें होणारा) क्रोध आमच्यापासून दूर असो. इन्द्र (आपल्या पराक्रमानें) प्रदेश (जिंकून, तो) आम्हाला (वसाहतीसाठी) देवो.

ऋ. ७ ८५ ३ : कृष्टीरन्यो धारयति प्रविक्ता
वृत्राण्यन्यो अप्रतीनि हन्ति ।

(तुम्हां दोहोंपैकी) एकजण (वरुण) त्यांचें व्यवस्थापन करतो, आणि दुसरा (इन्द्र) असलेल्या शत्रुंचा निःपात करतो.

# वैदिक देवतांचें अभिनवदर्शन

## व्याख्यान चौथें

### 'शिपिविष्ट' विष्णु

हिंदु देवतशास्त्राचा चिकित्सापूर्वक अभ्यास करतांना जे अनेक मूलभूत प्रश्न निर्माण होतात, त्यांत विष्णु या देवतेविषयींचा प्रश्न फार महत्त्वाचा समजला पाहिजे. वैदिक देवतामंडलांत विष्णूचें स्थान बव्हंशीं दुय्यम दर्जाचें आहे याच्या उलट, वेदोत्तर पुराणग्रंथांत विष्णूस सर्वश्रेष्ठ देव समजण्यांत आलें आहे. ब्रह्मा, विष्णु, आणि महेश या हिंदूंच्या त्रिमूर्तींतील विष्णूचें प्राधान्य सर्व पुराणाभ्यासकास सुपरिचितच आहे. वेदांतील सर्वप्रमुख अशा इन्द्रदेवतेस मागें टाकून, वेदांत जवळ जवळ उपेक्षित असलेल्या विष्णूला एवढें उच्च आणि उन्नत स्थान देण्यांत आलें ही घटना हिंदूंच्या दैवतशास्त्रीय विचारविकासांतील एक विस्मयजनक घटना अशीच मानली जाईल पण प्रथमतःच या व्याख्यानमालेच्या भूमिकेंत सुचविल्याप्रमाणे ही घटना घडून येणें ऐतिहासिक दृष्ट्या क्रमप्राप्तच होतें असें म्हणावयास पाहिजे आणि शिवाय, या घटनेचीं बीजेंहि ऋग्वेदाचा सूक्ष्म अभ्यास करणाऱ्या चिकित्सकास ऋग्वेदांतच सापडणें शक्य आहे ऋग्वेदांतील एकदोन ठिकाणच्या उल्लेखांवरून (२ १ ३; २२ १, ३४ ११) विष्णूस कांहींसें प्राधान्य दिल्यासारखें भासतें. परंतु ते उल्लेख अगदींच सामान्य स्वरूपाचे आहेत, विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांतील अनन्यसाधारण विशेष दर्शविणारे नाहींत, हें त्या उल्लेखांकडे बरवर पाहिलें तरी लक्षांत येण्यासारखें आहे. वैदिक दैवतशास्त्रांत,

वरुण किंवा इन्द्र या देवतांप्रमाणे, विष्णूचें वर्चस्व कधींहि प्रस्थापित झाल्याचें वैदिक उल्लेखांवरून दिसून येत नाहीं.

केवळ विष्णूला उद्देशून रचिलेलीं पांचच सूक्तें ऋग्वेदांत आहेत. कांहीं इतर सूक्तांत विष्णूचा दुसऱ्या एखाद्या देवतेबरोबर उल्लेख केलेला आहे. अशा रीतीनें सबंध ऋक्संहितेंत विष्णूच्या नांवाचा उल्लेख शंभरापेक्षा अधिक ठिकाणीं आलेला नाहीं. इतर अनेक देवतांपैकीं एक याच नात्यानें सामान्यतः वैदिक कवींनीं विष्णूकडे पाहिलें असलें पाहिजे. वेदांतील याच दुय्यम — किंवा तिय्यम — दर्जाच्या स्थानापासून विष्णूची प्रगति होत होत, जवळजवळ अचानक रीतीनेंच, त्याला हिंदूंच्या दैवतशास्त्रांतील सर्वोच्च स्थान प्राप्त झाल्याचें आपणांस दिसून येतें. किंबहुना असेंच म्हणावयास पाहिजे कीं वेदांतील अनेक लहान मोठ्या देवतांपैकीं, विष्णु — आणि कांहीं प्रमाणांत, रुद्र — या देवतांसच फक्त हिंदूंच्या त्रिमूर्तींमध्यें स्थान मिळालेलें आहे. हें कसें घडून आलें असलें पाहिजे? या बाबतींत कांहीं विद्वानांनीं असें सुचविलें आहे कीं वैदिक वाङ्मयांत व यागविधींतसुद्धा विष्णूचें श्रेष्ठत्व मान्य केलेलें आहे.[1] ऋग्वेदाचा चिकित्सापूर्वक अभ्यास करणारास हें म्हणणें पटण्यासारखें नाहीं. विष्णूस उद्देशून लिहिलेल्या ऋग्वेदांतील ऋचांच्या केवळ संख्येचा विचार केला तर विष्णु ही चवथ्या श्रेणीची देवता ठरते असेंच आढळून येतें. पण वैदिक कवींनीं इतक्या कनिष्ठ श्रेणीची मानलेली देवता पुढें एकदम हिंदूंची सर्वश्रेष्ठ देवता झाली असें म्हणणेंहि प्रत्ययदायी होणार नाहीं. मॅक्निकल यानें आपल्या *Indian Theism* या ग्रंथांत असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे कीं ऋग्वेदांतील कनिष्ठ प्रतीच्या विष्णुदेवतेचें माहात्म्य हळूहळू वाढत

(१) उदाहरणार्थ, पहा : H. C. RAYCHAUDHARI. *Early History of the Vaishnava Sect.* Calcutta Univ. 1936, pp. 7 ff.

गेल्याचीं स्पष्ट चिह्नें, संहितोत्तर ब्राह्मणवाङ्मयांत, उपलब्ध आहेत.[१] परंतु, ब्राह्मणवाङ्मयांत विष्णूला यज्ञसमान मानिलें आहे आणि यज्ञांतील दोष निवारण करण्याविषयीं त्याची प्रार्थना केली आहे, या उल्लेखां-वरूनच केवळ, ब्राह्मणकालीं, विष्णूचें श्रेष्ठत्व प्रस्थापित होत होतें असें म्हणतां येणार नाहीं. कारण अशा प्रकारचे उल्लेख, ब्राह्मणांत, निरनिराळ्या देवतांविषयीं, निरनिराळ्या प्रसंगीं, केलेले आढळून येतात. शिवाय, वादासाठीं मॅक्निकल यांचें म्हणणें क्षणभर मान्य केलें, तरीहि विष्णूविषयीं उपस्थित केलेला मूलभूत प्रश्न शिल्लक उरतोच.

या सर्व गोष्टींचा विचार केला तर, उपर्युक्त विष्णुविषयक प्रश्नासंबंधीं एक कामचलाऊ उपपत्ति म्हणून अशी सुचवितां येईल कीं, विष्णूच्या मूळच्या व्यक्तिमत्त्वांत आणि स्वभावधर्मांतच असे कांहीं अंश असले पाहिजेत कीं ज्यांचा पुढें, कांहीं कारणांमुळें, विशिष्ट रीतीनें विकास होऊन, विष्णूस वेदोत्तर देवतशास्त्रांत सर्वश्रेष्ठ स्थान प्राप्त झालें. या उपपत्तीचाच दुसरा भाग म्हणजे असा कीं, कांहीं कारणांमुळें, वैदिक वाङ्मयांत, विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांतील आणि स्वभावधर्मांतील उपर्युल्लिखित अंश वैदिक कवींनीं — कदाचित् हेतुपुरःसर — दडपून टाकले असावेत. या संदर्भांत, एका गोष्टीचा प्राधान्यानें उल्लेख करणें अत्यावश्यक आहे. ऋग्वेदसंहिता म्हणजेच प्राचीन वैदिक आर्यांचें संपूर्ण वाङ्मयधन असें समजून चालणार नाहीं. ऋग्वेदकालीं निर्माण झालेल्या वाङ्मयापैकीं फारच थोडा भाग ऋग्वेदसंहितेच्या द्वारा आपणांस उपलब्ध झालेला आहे असें म्हटलें तरी चालेल. तसेंच, ऋग्वेदांत किंवा तदधिष्ठित इतर वैदिक वाङ्मयांत वैदिक आर्यांच्या मानवसमूहापैकीं सर्वच थरांतील लोकांचें जीवन आणि विचार प्रतिबिंबित झाले आहेत असेंहि समजतां येणार नाहीं. तेव्हा वैदिक संहिता

(१) Macnicol. *Indian Theism.* London 1915, pp. 30 ff.

ज्यांनी निर्माण केल्या त्यांच्या मतांचा आणि विचारांचा प्रभाव त्या संहितेत समाविष्ट होणाऱ्या विचारांवर पडणें साहजिकच होतें. वैदिक आर्यांमध्ये निरनिराळे दैवतशास्त्रीय पंथ— religio-mythological cults— अस्तित्वांत असले पाहिजेत. संहिताकर्त्यां वैदिक कवींत ज्या मानाने एखाद्या दैवत-पंथाचे अनुयायी असतील त्या मानानेच त्या विशिष्ट देवतेस संहितेंत महत्त्व दिलें गेलें. वसिष्ठ हे वरुणपंथाचे अभिमानी होते, आणि इन्द्रपंथाचें वर्चस्व प्रस्थापित झाल्यावरहि त्यांनी ऋग्वेदकालीन या दोन दैवतशास्त्रीय पंथांचा समेट घडवून आणण्याचा प्रयत्न केला हें मागे सुचविलेंच आहे. तसेंच भारद्वाज हे 'पूषन्' या देवतेचे विशेष अभिमानी असले पाहिजेत हेंहि सहाव्या मंडलांतील 'छोटी पूषन्–संहिता' (६.५३–५८) सूक्ष्मपणें अभ्यासणारांस कळून येण्यासारखें आहे.[१] वैदिक काळीं विष्णूचाहि एखादा विशिष्ट पंथ अस्तित्वांत असला पाहिजे. परंतु त्या पंथाच्या अनुयायांना वैदिक वाङ्मयांत आणि दैवतशास्त्रांत फारसें महत्त्व प्राप्त झालें नसलें पाहिजे. तरीहि वैदिक संहिताकर्त्यांना विष्णूचा ऋग्वेदांत समावेश करणें इष्ट वाटलें असावें, किंवा भाग पडलें असावें. पण त्याबरोबरच विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांतील कांही प्रमुख अंशांना प्राधान्य न देणें—किंबहुना त्यांना दडपून टाकणें—हेंहि त्यांना इष्ट वाटलें असावें. इतकें करूनहि ऋग्वेदांत विष्णुविषयीं, वरवर पाहणारांस अनाकलनीय, व सामान्यतः विसंगत, असंबद्ध, आणि अप्रस्तुत वाटणारे—पण सूक्ष्मपणें त्यांकडे पाहिलें असतां अतिशय महत्त्वाचे ठरणारे—कांही उल्लेख आलेले आहेत. त्यांवरून विष्णूचें मूळ स्वरूप काय असलें पाहिजे हें कळून येतें, आणि विष्णुपंथाचे मूळ अनुयायी कोण असले पाहिजेत याविषयींहि अनुमान करणें शक्य

(१) याविषयीं प्रस्तुत लेखकाचा पुढील लेख पहा : "Pūṣan, the Pastoral God of the Veda". NIA V, 49–66.

होतें. कालक्रमानुसार, भारतीय आर्यांच्या सांस्कृतिक इतिहासांत, या विष्णुपंथीयांना महत्त्व प्राप्त झालें आणि त्याबरोबरच त्यांचा प्रमुख देव जो विष्णु तोहि भारतीय आर्यांचा—हिंदूंचा—सर्वश्रेष्ठ देव ठरला! हाच इतिहास आपणांस आतां पहावयाचा आहे.

ऋग्वेदांत विष्णुसंबंधीं फारशा पुराणकथा (myths) दिलेल्या नाहींत. त्याच्यासंबंधीं फक्त दोनच गोष्टींचा वारंवार प्रामुख्याने उल्लेख केलेला आढळतो. एक म्हणजे त्याने सर्व विश्व आक्रांत करतांना टाकलेलीं तीन पावलें—'त्रीणि विक्रमणानि!' आणि दुसरी म्हणजे त्याने इन्द्र-वृत्र-संग्रामांत इन्द्राला केलेलें साहाय्य!! विष्णु-विषयक या दोन घटनांचा वेदांत कधी कधी स्वतंत्र दोन घटना म्हणून (१·१५४·२–३, १·१५५·४–५; ७ १००. ३–५; ८२९७), आणि कधी परस्परसंबद्ध घटना म्हणून (४ १८·११; ८·१००·१२) उल्लेख केल्याचें आढळून येतें. आता सांगितलेल्या दोन घटनांशिवाय *विष्णूनें जगन्निर्मिति केली, विश्वांतील निरनिराळ्या विभागांस सावरून धरलें*, वगैरे अर्थांचे उल्लेखहि ऋग्वेदांत कांही ठिकाणीं आलेले आहेत (१·१५४ १–२; ६.६९.५; ७.९९. २–३). परंतु हे उल्लेख विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांतील अनन्यसाधारण वैशिष्ट्यांचे द्योतक नसून, वैदिक दैवतशास्त्रांतील एका विशिष्ट आणि सुपरिचित अशा प्रवृत्तीचे—kathenotheistic tendency चे—निदर्शक आहेत हें सांगावयास नकोच. तेव्हा विष्णूच्या मूळ व्यक्तिमत्त्वाचा व स्वभावधर्मांचा अभ्यास करावयाचा असेल तर तो वर उल्लेखिलेल्या विष्णुविषयक दोन घटनांना प्रारंभबिंदु कल्पूनच केला पाहिजे.

विष्णूनें इन्द्र-वृत्र-संग्रामांत इन्द्रास केलेल्या साहाय्याचें आपण प्रथमतः विश्लेषण करूं. ऋग्वेदांतील एतद्विषयक उल्लेखांचा अगदी वरवर जरी विचार केला तरी असें सहज आणि स्पष्टपणें कळून येईल कीं या घटनेंत विष्णूचा इन्द्राशीं घडवून आणलेला संबंध सर्वथैव पल्लवग्राही

स्वरूपाचा आहे. 'वृत्रहा' इन्द्राने वृत्रादिकांचें पारिपत्य केलें हा वैदिक कवींचा अत्यंत आवडता विषय आहे. ऋग्वेदांतील बराचसा भाग याच विषयाला वाहिलेला आहे असें आपण मागे पाहिलेंच आहे. त्या सर्व सूक्तांचा चिकित्सापूर्ण अभ्यास केला तर आपली अशी खात्री पटते की वृत्रादिकांच्या निर्दालनाचें सर्व श्रेय केवळ इन्द्रालाच द्यावें लागेल. या कामासाठी इन्द्र हा कोणावरहि अवलंबून राहिलेला नव्हता.[४] शिवाय, विष्णूने इन्द्रास साहाय्य केलें या अर्थाचे जे थोडे उल्लेख ऋग्वेदांत आहेत, ते अगदी रंगहीन, विशिष्टार्थहीन, सांकेतिक स्वरूपाचे असे आहेत. विष्णूने जर खरोखरच इन्द्रास साहाय्य केलें असतें तर तें ज्या विशिष्ट परिस्थितींत आणि ज्या विशिष्ट रीतीने केलें त्यांचा एतद्विषयक सूक्तांत अवश्य निर्देश व्हावयास पाहिजे होता. पण तसा तो झालेला दिसत नाही. याच्या उलट, विष्णूच्या 'तीन पावलांचा' विक्रम—जो सर्वस्वीं त्याचाच आहे—त्या विक्रमाचें श्रेयहि कांही ठिकाणीं इन्द्रास देण्यांत आलें आहे.[५] या सर्व गोष्टी विचारांत घेतां मला असें म्हणावयाचें आहे की कांही वैदिक कवींनी, विष्णूला, या वीरकर्मांत इन्द्राचा साहाय्यक मानलें, ती त्यांची पश्चाद्बुद्धि —afterthought — आहे. ती घटना म्हणजे ऐतिहासिक सत्य नव्हतें. ती कृत्रिम असून, वैदिक कवींनी निःसंशय हेतुपुरःसर कल्पिलेली आहे. हिलेब्रांट वगैरे वैदिक देवतशास्त्राचे जे निसर्गशक्तिवादी आधुनिक उपपत्तिकार आहेत, त्यांनाहि विष्णु आणि इन्द्र यांचा संबंध हा कृत्रिम आणि पश्चाद्बुद्धिजन्य आहे हें पूर्णपणें पटलें आहे.[६] असें जर आहे तर साहजिकच असा प्रश्न उद्भवतो की, कांही वैदिक कवींनी, मूलतः परस्परांशीं असंबद्ध अशा या दोन देवतांचा संबंध कृत्रिमपणें कां घडवून

(४) या बाबतींत तै. सं. ६-५-१-१; २-४-१२ हे उल्लेख विशेष महत्त्वाचे आहेत.

(५) उदाहरणार्थ, ऋ. ६-६९-५.

(६) HILLEBRANDT. VMIII, pp. 348 ff.

आणला असावा ? वैदिक देवतशास्त्र हें विकसनशील आहे, केवळ स्थितिमान् नाही, हें माझ्या एतद्विषयक भूमिकेंतील एक महत्त्वाचें प्रमेय आहे. बदलत्या परिस्थितीस अनुसरून एखाद्या देवतेविषयींच्या आपल्या कल्पनेंत वैदिक कवींनी अनुरूप आणि आवश्यक असा बदल केलेला आहे. एखाद्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वांत परस्परांशीं असंबद्ध–व, कांहीं ठिकाणीं तर, परस्परांशीं विरोधी–असे अंश असलेले आपणांस दिसून येतात. मागें सांगितल्याप्रमाणे, हे भिन्न अंश म्हणजे विकसनशील देवतशास्त्रांतील विकसनशील कल्पनांचे परिणाम आहेत. एखाद्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वांतील निरनिराळ्या अंशांचें पौर्वापर्य सयुक्तिक रीतीनें निश्चित करून, त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास कसा आणि कां झाला असावा हें दाखवून देणें हेंच वैदिक देवतशास्त्राच्या अभ्यासकांचें मुख्य कार्य समजलें पाहिजे. या दृष्टीनें विचार केला तर असें दिसून येईल कीं आपल्या पंथाच्या विशिष्ट देवतेचें माहात्म्य–मुळांत कमी असलेलें माहात्म्य–प्रस्थापित करावयाची वैदिक कवींची एक विशिष्ट पद्धति होती. ती अशी: वैदिक देवतशास्त्र हें सर्वथैव इन्द्रप्रधान आहे. सामान्यतः सर्व वैदिक आर्यांनी मान्यता दिलेला इन्द्र हाच एक एव श्रेष्ठ देव आहे. म्हणून एखाद्या देवतेचें महत्त्व वाढविण्यासाठी त्या देवतेचा इन्द्राशीं–या ना त्या रीतीनें–संबंध घडवून आणावयाचा, व असें करून, इन्द्राच्या माहात्म्याच्या संसर्गामुळे, त्या देवतेस महत्त्व मिळवून द्यावयाचें. सामान्यतः वैदिक आर्यांनी मान्यता न दिलेल्या देवतेचें हें एक प्रकारचें देवतशास्त्रीय 'दत्तविधान'च म्हणावयाचें. अशा देवतेस वैदिक देवतामण्डलांत, मूलतः मानाचें स्थान दिलेलें नसेल तर, इन्द्राशीं त्या देवतेचा संबंध घडवून आणून, कायदेशीर किंवा सनदशीर मार्गानें, तिला तें मिळवून देतां येत असे. विष्णूच्या बाबतींतहि हीच गोष्ट घडली असावी.

इन्द्र विष्णु-संबंधाच्या तीन प्रमुख अवस्था ऋग्वेदीय सूक्तांत आपणांस दिसून येतात. पहिली म्हणजे वृत्रनिर्दाळनाच्या वीरकर्म प्रसंगीं इन्द्र आणि विष्णु या दोघांना, समान दर्जाचे सहकारी या

मान्याने, वैदिक कवींनी मान्यता दिली आहे (४.१८.११; ८.१२.२७; ८५२.३). दुसरी अवस्था म्हणजे कांही ठिकाणी (८.३१.१०)—कदाचित्, विष्णुपंथाचे अनुयायी असलेल्या कवींनी—विष्णूस इन्द्रापेक्षाहि अधिक श्रेष्ठ मानलेलें आहे; आणि विष्णु हा इन्द्राचा सहकारी नसून इन्द्र हा विष्णूचा सहकारी—विष्णोः सचाभुव.—होता असें सुचविलें आहे. आणि तिसरी अवस्था म्हणजे विष्णूस इन्द्राचा कनिष्ठ सहकारी समजण्यांत आलें आहे, व तो आपल्या 'तीन पावलांच्या' विक्रमासाठी लागणारें बल इन्द्राकडूनच मिळवितो (८.१२.२७), तसेंच तो इन्द्राची स्तुति-स्तोत्रें गातो (८.१५.९) असें सुचविलें आहे.[७] या तीन अवस्थांवरून एक महत्त्वाची गोष्ट स्पष्ट होते ती अशी की इन्द्र-विष्णु-संबंध हा जिवंत—किंवा सत्य—संबंध नसला पाहिजे. कारण त्याविषयी वैदिक कवींचें एकादें निश्चित मत असल्याचें दिसून येत नाही. मागे सुचविल्याप्रमाणे, विष्णूचें माहात्म्य वाढविण्यासाठी विष्णुपंथीयांनी केलेल्या प्रयत्नांचा हा परिणाम असावा. विष्णु आणि इन्द्र यांना एकत्र आणण्याच्या बाबतींत वैदिक कवींच्या मनांत जी एक प्रकारची अनिश्चितता—संदिग्धता—असलेली आपणांस दिसून येते त्याचें कारण हेच. त्यांच्यापैकी कांही कवींना, कांहीतरी करून, विष्णूचा सर्वमान्य अशा इन्द्राशीं संबंध घडवून आणून त्याला 'अधिकृत' वैदिक दैवत-शास्त्रांत मानाने प्रवेश मिळवून द्यावयाचा होता. या प्रयत्नांत कांही वैदिक कवि तर इतके पुढे गेले की त्यांनी विष्णूला इन्द्रा-पेक्षाहि अधिक श्रेष्ठ मानिलें.

विष्णुविषयी इतका निष्ठापूर्वक उत्साह दाखविणारे लोक कोण असावेत? विष्णु हा ब्राह्मणांचा देव होता, व इन्द्र हा क्षत्रियांचा देव होता, आणि विष्णु व इन्द्र यांच्या या संबंधाच्या द्वारा, ब्राह्मण व

(७) वेदोत्तरकालीन दैवतशास्त्रांत विष्णूला उपेन्द्र हें नांव दिलें जानें याचें बीज याच अवस्थेंत सापडतें.

क्षत्रिय यांचा समेट झाल्याचें सूचित केलें आहे अशी एक उपपत्ति याविषयीं पुढे मांडली गेली आहे.[८] आपाततः विचार केला तरीसुद्धा ही उपपत्ति मुळींच स्वीकरणीय नाहीं असें कळून येईल. माझ्या मतें, या बाबतीत दोन अनुमानें संभवतात. पहिलें असें: विष्णु ही वेदपूर्वकालीन 'आदिवासी' भारतीयांची सर्वप्रमुख देवता असावी[९] आणि म्हणून वैदिक कवींनी त्या देवतेचा आपल्या 'अधिकृत' देवतामंडलांत सहजरीत्या स्वीकार केला नाहीं. आर्यांचा आणि आदिवासी भारतीयांचा संस्कृतिसंगम झाला, त्यावेळींहि त्यासाठीं विशेष प्रयत्न करावा

(८) इ जे मिस याने आपल्या *Vedic Hymns* या ग्रंथांत पान ४२ वर उद्धृत केल्याप्रमाणे बार्नेट यांचें मत असें आहे की विष्णु म्हणजे केवळ यागविधींचें जें मूलभूत सार त्या साराचें देवतास्वरूप आहे. यावरून बार्नेटच्या मनांतहि अशीच एखादी उपपत्ति अभिप्रेत असावी असें दिसतें घोष यांच्या मतें ( *Aryan Trail in India and Iran*, 62 ) विष्णु आणि इन्द्र हे दोघे दोन भिन्न टोळ्यांचे देव असावेत.

(९) प्रिझुल्युस्की ( "Le nom du dieu Visnu et la legende de Krsna", *Arch. Or* 4, 261 ff ) यांच्या मतें वैदिक विष्णूचा प्रतियोगी दुसऱ्या कोणत्याहि युरोभारतीय देवतशास्त्रांत आढळत नाहीं. म्हणून विष्णु ही मूळची भारतीय देवताच असावी दक्षिण भारतांत केन्द्रीय विभागांत राहणाऱ्या विठ या अनार्य लोकांशीं विष्णूचा मूळचा संबंध असावा असेंहि प्रिझुल्युस्की पुढे म्हणतो सुनीतिकुमार चतर्जी ( *TKBG* LXVIII, 82 ) यांच्या मतें आर्यांची सूर्यदेवता 'विष्णु' आणि द्रविड लोकांची आकाशदेवता 'विण्' 'विण्णु' या दोन्ही एकत्र होऊन उत्तरकालीन हिंदूंच्या सूर्यनारायणाची कल्पना निर्माण झाली असावी पी टी एस् आय्यंगार यांच्या मतें विष्णु हा शब्द द्राविड 'विण्' या शब्दाचें स्वरूपांतर आहे ( *Life in Ancient India in the Age of the Mantras*, 126 ). रामस्वामी ऐय्यर (*JAHRS* 1931, 42 fn 3 ) यांनी आय्यंगार यांच्या मताचें खंडन केलें आहे

लागला. दुसरें अनुमान—आणि तेंच मला अधिक सयुक्तिक वाटतें—असें: वैदिक आर्यांपैकींच एका फार मोठ्या जमातीची विष्णु ही सर्वश्रेष्ठ देवता होती. पण ऋग्वेदकाळीं पुढारलेलीं म्हणून समजलीं जाणारीं वैदिक आर्यांचीं जीं कुटुंबें होतीं त्या कुटुंबांतील कवींच्या मनाला, विष्णूच्या मूळ व्यक्तिमत्त्वांतील कांही अंश, कांही कारणांमुळे, न रुचण्यासारखे होते, आणि म्हणून, त्या कवींनी आपल्या 'अधिकृत' देवतामण्डलांत विष्णूस सहजगत्या प्रवेश करूं दिला नाही. तो प्रवेश प्रयत्नपूर्वक मिळवावा लागला. आणि 'अधिकृत' वैदिक देवतामण्डलांत विष्णूला स्थान मिळालें तेव्हाहि 'प्रतिष्ठित' वैदिक कवींनी विष्णूच्या मूळच्या व्यक्तिमत्त्वांतील कांही अंश दडपून टाकले. विष्णु आणि इन्द्र यांच्यामधील संबंधाचें वर केलेलें विश्लेषण, आणि त्यावरून काढलेला निष्कर्ष हा आपल्या विष्णुविषयक विवेचनाचा उचित असा प्रारंभबिन्दु होऊं शकेल!

विष्णुविषयीच्या दैवतशास्त्राचा अधिक महत्त्वपूर्ण विशेष म्हणजे त्याचीं 'तीन पावलें'. विष्णूच्या या 'तीन पावलांचा' खरा अर्थ काय असावा? यासंबंधी निरुक्तकार यास्कांनी आपल्यापूर्वींच्या दोन विद्वानांचीं मतें निरुक्तांत (१२-१९) उद्धृत केलेलीं आहेत :

यदिदं किं च तद् विक्रमते विष्णुः। त्रिधा निधत्ते पदं त्रेधाभावाय। पृथिव्यां अन्तरिक्षे दिवि इति शाकपूणिः। समारोहणे विष्णुपदे गयशिरसि इति और्णवाभः।

आधुनिक वेदाभ्यासकांच्या पहिल्या पिढींतील रोट, व्हिट्ने, विल्सन, केगी, मॅक्स म्यूलर, डाउग, इत्यादि विद्वानांनी और्णवाभाच्या मताचा अनुवाद केलेला आहे[१०]. त्यांचें म्हणणें असें कीं विष्णूचीं तीन पावलें म्हणजे उदय, आकाशमध्यस्थिति, व अस्त या सूर्याच्या तीन

(१०) पहा : MACDONELL. *Vedic Mythology.* पान ४२ वरील ५ वी टीप.

अवस्थांचीं प्रतीकें आहेत. ऋग्वेदांतील विष्णुविषयक सूक्तांतून त्या देवतेचें सौर स्वरूपच विशेष प्राधान्यानें दर्शविलें आहे यांत शंका नाही. कारण त्या सूक्तांत विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांतील जीं कांहीं गौण वैशिष्ट्यें सुचविलीं आहेत तीं देखील त्याच्या सौर स्वरूपाशींच अधिक जुळणारीं आहेत. 'पृथिवीं शतर्चसम्' (७·१००·३), 'स्वदृंश्' (१·१५५·५), 'विभूतद्युम्न' (१·१५६·१) इत्यादि विष्णुविषयक जे निर्देश ऋग्वेदांत आढळतात त्यांवरून विष्णु ही तेजाशीं विशेष प्रकर्षानें संबद्ध अशीच देवता असली पाहिजे असें निश्चितपणें वाटूं लागतें.[११] विष्णूच्या ऋग्वेदांतील प्रमुख निविदा म्हणजे 'उरुगाय,' 'एष,' 'एवयावन्,' 'धर्माणि धारयन्,' 'ऋतस्य गर्भ,' 'वेधाः,' 'पूर्व्य,' आणि 'नव्य' अशा आहेत. सूर्य हा आपल्या दीर्घ पदन्यासांच्या योगानें एका क्षितिजापासून दुसऱ्या क्षितिजापर्यंत सर्व अन्तरिक्षाचें आक्रमण करतो. आणि ही सर्व प्रचंड आक्रमणक्रिया तो अवघ्या एका दिवसांत संपवितो. तसेंच तो आपल्या नियमित मार्गापासून कधींहि च्युत होत नाही, किंवा आपली वेळहि चुकत नाही. तो प्राचीन आहे, कारण जगाच्या अगदीं आरंभापासून, तो रोज अन्तरिक्षाचें आक्रमण करीत असल्याचें सर्वांस माहित आहे. पण त्याबरोबरच तो 'अभिनव' असाहि आहे, कारण रोज सकाळीं तो नव्यानेच आपल्याला दिसतो. अशा रीतीनें, विष्णूच्या उपर्युल्लिखित निविदांवरून त्याचीं जीं चार वैशिष्ट्यें सूचित होतात—म्हणजे, दीर्घ पदन्यास, शीघ्रगतित्व, नियमित मार्गक्रमण, आणि यौगपदिक प्राचीनत्व व अभिनवत्व—तीं सर्व सूर्यदेवतेच्या ठिकाणीं एकत्र अस्तित्वांत आहेत. म्हणून ऋग्वेदांतील विष्णूचें सौर स्वरूप बहुंशीं संशयातीत आहे. शतपथब्राह्मणांत (१४·१·१·१०) असा

(११) या संदर्भांत पुढील उल्लेखहि लक्षांत घेण्यासारखे आहेत: १·२२·२०; १५४·६, १५५·२, ६, अथर्व. १३·२·३१. विष्णूचा तपाशीं (अथर्व ५·२६·७), आणि दीक्षादिकांशीं (१·२२·२१, तै. सं. ५ ५·१·४, तै. ब्रा. ३ ४·३·३-४) जोडलेला संबंध त्याच्या अग्नि (= सूर्य) स्वरूपाचा द्योतक समजला पाहिजे.

उल्लेख आला आहे की विष्णूचें मस्तक तोडलें गेलें, आणि नंतर तें सूर्य बनलें. पण या बाबतींतील सर्वांत अधिक प्रत्ययदायी पुरावा ऋग्वेदांतील एका वचनांत ( १·१५५·६ ) आढळतो. आपल्या, प्रत्येकीं चार नांवें धारण करणाऱ्या, नव्वद घोड्यांना, एखाद्या फिरणाऱ्या चक्राप्रमाणे, प्रवर्तित करणारा म्हणून, त्या ठिकाणीं, विष्णूची प्रशस्ति केली आहे. ऋग्वेदांतील पहिल्या मंडलांतील एकशेचौसष्टाव्या सूक्तांतील कांहीं ऋचांच्या अनुषङ्गाने वरील निर्देशाचा विचार केला तर विष्णूचे घोडे म्हणजे दिवस, आणि त्यांचीं प्रत्येकीं चार नांवें म्हणजे चार ऋतु असले पाहिजेत याविषयी शंका वाटत नाहीं. अर्थात् वरील वर्णन हें सूर्यदेवता ३६० दिवसांचें वर्ष निर्माण करते या घटनेचें वर्णन आहे. विष्णूला ऋग्वेदांत ( १.१५४·३ ) 'गिरिक्षित' असें संबोधिलें आहे. त्याचें कारण म्हणजे तो उच्च आकाशांत वास करतो हें असणें असंभवनीय नाहीं. तौलनिक देवतशास्त्राच्या दृष्टीने, ग्युंटर्ट या पंडिताने एका विष्णुसूक्तांतील, विष्णोः पदे परमे मध्व उत्सः ( १·१५४·५ ) या उल्लेखाच्या, एका प्राचीन लेटिश गीतांतील पंक्तिद्वयाशीं असलेल्या सादृश्यावर भर दिलेला आहे. त्या पंक्तिद्वयाचा अर्थ असा आहे की 'ऊसिंग' हा आपल्या घोड्याच्या पदन्यासाच्या ठिकाणीं 'मधु' निर्माण करतो. लेटिश देवतशास्त्रांत 'ऊसिंग' ही सूर्यदेवता आहे."

वेदोत्तर कालांत विष्णूचें जें स्वरूप सर्वसमत झालें त्यांतील कांहीं अंशहि, त्या देवतेच्या ऋग्वेदांतील सौर स्वरूपाचे निदर्शक आहेत. विष्णूचें सुदर्शन चक्र हें सूर्यचक्राचें प्रतीक असूं शकेल. सूर्याच्या जीवनदायी प्रकाशाचें प्रतीक म्हणजे विष्णूच्या हातांतील 'पद्म'. आणि विष्णूचा पीतांबर हा सूर्याच्या तेजस्वी किरणांच्या समूहाचा

(१२) H. Güntert. *Der arische Weltkönig*, 300. Schr- . . . *Ari*. . . m II, 669.

द्योतक असणें असंभवनीय नाहीं. अशा रीतीनें, वेदोत्तर देवतशास्त्रांतहि, विष्णूच्या ऋग्वेदीय सौर स्वरूपाची स्मृति कायम ठेविली गेली आहे. याच संदर्भात विष्णूच्या दोन पौराणिक नांवांचा उल्लेख करणें अप्रस्तुत होणार नाहीं. तीं नांवें म्हणजे 'केशव' आणि 'हृषीकेश'.[13] सूर्याच्या किरणांचा, कविकल्पनेनें, केसाशीं संबंध जोडलेला आहे हें सुपरिचितच आहे. प्राचीन देवतशास्त्रांतील 'सूर्याश्व'—sun-horse—विषयक कल्पना विष्णूच्या 'हयशिराः' किंवा 'हयमुख' या नांवांनीं सूचित केलेली आहे. *गरुडपक्षी हें पौराणिक विष्णूचें प्रिय वाहन आहे. आणि गरुडाची*—किंवा सुपर्णाची—कल्पना ही सूर्यपक्ष्याच्या कल्पनेवरच आधारलेली आहे.

अशा रीतीनें ऋग्वेदांतील आणि वेदोत्तर पुराणवाङ्मयांतील एकंदर पुराव्यावरून, *हीं गोष्ट स्पष्ट होते की वैदिक विष्णूच्या व्यक्तिमत्त्वात* सूर्यदेवतेचे अंश फार मोठ्या प्रमाणांत अस्तित्वांत होते—इतक्या मोठ्या प्रमाणात की वैदिक विष्णु ही मूळची सूर्यदेवताच होती असें म्हणण्याचा मोह एखाद्याला व्हावा! याच्या उलट, वैदिक विष्णूच्या वर्णनात अशा कांहीं चमत्कारिक विशेषांचा उल्लेख केलेला आहे की ते विशेष, विष्णु म्हणजे सूर्यदेवताच या सिद्धान्तास, सर्वथैव बाधक ठरावेत. या दोन परस्परविरुद्ध अशा वाटणाऱ्या गोष्टींची संगति लावणें अगदींच अशक्य नाहीं. या बाबतींत मला असें सुचवावयाचें आहे की वैदिक वाङ्मयात किंवा वैदिक यागविधींत अस्पष्टपणें व्यक्त झालेले, आणि सामान्यतः दुर्ज्ञेय समजले जाणारे, विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांतील जे विशेष त्याच्या, इतर पुराव्यावरून सिद्ध होणाऱ्या, सौर स्वरूपाशीं असंबद्ध असें वाटतात, तेच त्याच्या मूळ स्वरूपाचे द्योतक असले पाहिजेत. वैदिक वाङ्मयांत आणि वैदिक देवतशास्त्रात विष्णूचा अविकृतपणें प्रवेश करवून

(१३) कांहीं पुराणांत हृषीकेश या शब्दाचा अर्थ हृषीकांचा म्हणजे इन्द्रियांचा ईश असा दिलेला आहे, पण तो बरोबर असेल असें वाटत नाहीं.

घेतांना, तत्कालीन प्रतिष्ठित कवींनी, कांहीं कारणांमुळे — त्या कारणांचा ऊहापोह आपणांस पुढे करावयाचाच आहे — विष्णूच्या मूळ स्वरूपांतील कांहीं अंश दडपून टाकले, व त्याच्यावर, त्याच्या मूळ स्वरूपावरूनच — पण अगदी परोक्षतया — सुचणारें असें सौर स्वरूप लादलें. पण या त्यांच्या हेतुपूर्वक केलेल्या प्रयत्नानंतरहि विष्णूच्या मूळ स्वरूपांतील कांहीं विशेषांचा वैदिक वाङ्मयांत आणि यागविधींत प्रवेश झालाच. अर्थातच हे विशेष, ऋग्वेदांत प्राधान्यानें भासमान होणाऱ्या विष्णूच्या सौर स्वरूपाशीं, असंबद्ध — आणि म्हणूनचसामान्यतः दुर्ज्ञेय असे — वाटतात. पण येवढें मात्र खरें की याच सामान्यतः दुर्ज्ञेय अशा निर्देशांमुळे विष्णूचें मूळचें व्यक्तिमत्त्व काय असलें पाहिजे याचा निर्णय करण्याचें एक महत्त्वाचें साधन आपणांस उपलब्ध झालें आहे.

ओल्डेनबेर्ग या ख्यातनाम जर्मन पंडितास ऋग्वेदीय विष्णूचें सौर स्वरूप मान्य नाहीं.[१४] त्यानें असें सुचविलें आहे की एखाद्या मूळच्या सूर्यदेवतेपासून, कांहीं कल्पनासंकरामुळे, विष्णु ही, सूर्यदेवतेहून भिन्न अशी, देवता निर्माण झाली असणें असंभवनीय नाहीं. ऋग्वेदीय विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांत मात्र, त्याच्या मतें, सौर स्वरूपाचे कोणतेच निश्चित अंश आढळून येत नाहीत. विष्णूचें सूर्यदेवतेशीं सादृश्य सुचविणारी जर कोणती मुख्य कल्पना असेल तर ती त्याच्या तीन पावलांची ! आणि ओल्डेनबेर्गनें तर हीच कल्पना अगदीं अविशिष्टार्थ-द्योतक, सामान्य स्वरूपाची अशी ठरविली आहे. त्याच्या मतें, त्या कल्पनेंतील 'तीन' ही संख्या केवळ गूढार्थानें मंगलसूचक अशीच समजली पाहिजे. त्या संख्येवरून कुठल्याहि नैसर्गिक घटनेचा बोध होऊं शकत नाहीं.[१५] 'तीन' या संख्येविषयीं बेर्गेन्य या फ्रेंच पंडितानेंहि जवळ-

(१४) H. Oldenberg. *Rel. d. Veda*, 228–233.

(१५) Oldenberg. उ. प., २३१.

जवळ असेंच मत व्यक्त केलें आहे.[१६] तेव्हां वेदांतील विष्णुविषयक दैवतशास्त्रांत जर कोणता प्रवर्तक हेतु असेल तर तो अवकाशाच्या विस्ताराचाच असा ओल्डेनबेर्गे याच्या प्रतिपादनांतील मुख्य मुद्दा आहे. ओल्डेनबेर्गच्या मतें 'उरुगाय', 'उरुक्षिति', 'उरुषु विक्रमणेषु', 'विगामन्', इत्यादि विष्णुविषयक जे निर्देश ऋग्वेदांत आढळतात, त्यांवरून एक गोष्ट अगदीं स्पष्ट होते ती ही कीं विष्णु ही मुख्यतः प्राधान्यानें 'अवकाशाची देवता' (Space-Divinity) असावी. कारण विष्णूच्या सर्व वर्णनांत, त्यानें विस्तृत अवकाशाचें आक्रमण केलें या घटनेवरच मोठा भर दिला गेलेला आहे. शतपथब्राह्मणांतील एका उल्लेखांतहि (१.२.५.१) विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांतील हाच विशेष प्राधान्यानें निर्देशिलेला आहे. विष्णु ही देवता अवकाशाचें आक्रमण करते, अवकाशाचें व्यवस्थापन करते, आणि मानवांना, त्यांच्या वसतीसाठीं अवकाश उपलब्ध करून देते. या आपल्या उपपत्तीस

(१६) BERGAIGNE. *La Religion Védique* II, 115 ff.; 414 ff. या मताच्या पुष्ट्यर्थ अवेस्तांतील अमेश स्पेंतांच्या 'तीन' पदन्यासांचा आणि अङ्ग्र मन्यूच्या 'त्रि'विध विस्ताराचा, तसेंच मृतांच्या आत्म्यांनी स्वर्गाप्रत जातांना टाकलेल्या 'तीन' पावलांचा हवाला देण्यांत येतो. पण विष्णूच्या 'तीन' पदन्यासांविषयी ऋग्वेदांत जे उल्लेख आले आहेत त्यांचा बारकाईनें विचार केला तर असें दिसून येईल की त्या उल्लेखांत 'तीन' या संख्येला एक विशिष्ट, मूर्त स्वरूपाचा, *concrete* असा अर्थ आहे. ती संख्या केवळ अमूर्तार्थदर्शक नाही. दर्शपूर्णमासयागांत 'त्रीन् विष्णुक्रमान् क्रामति' असा ज्या तीन विष्णुपदांचा उल्लेख आहे तीं तीन पदें म्हणजे जगताच्या तीन विभागांचीं प्रतीकें आहेत. ऋग्वेदांतहि विष्णूच्या 'तीन' पदांचा अर्थ तोच आहे हें पुढे दाखवावयाचेंच आहे. या संदर्भात पहा: HOPKINS, "Numerical Formulae in the Veda and their bearing on Vedic Criticism". *JAOS* XVI, 275 ff.

धरून, ओल्डेनबेर्गने 'विष्णु' या शब्दाचा व्युत्पत्तिसिद्ध अर्थ 'अवकाशगामी' असा केलेला आहे.

ओल्डेनबेर्ग या वैदिक पंडिताला जर्मनीत anti-solar-mythologist, म्हणजे सौरस्वरूपविरोधी, देवतशास्त्रज्ञ समजत असत. वैदिक दैवतशास्त्राच्या अभ्यासकांच्या मनावर या अवास्तव सौरकल्पनेचा फार मोठा पगडा बसलेला आहे, आणि त्यामुळे वैदिक देवतांकडे पाहण्याची त्यांची दृष्टि विकृत आणि एकांगी बनली आहे असें ओल्डेनबेर्गचें मत होतें. आणि, एकंदर विचार केला तर, ओल्डेनबेर्गच्या मतांत पुष्कळच तथ्य आहे असें आपणांस आढळून येईल. अर्थात्, सौरकल्पनेला बाजूला सारून, वैदिक देवतांच्या मूळ स्वरूपाविषयी ओल्डेनबेर्गने ज्या उपपात्ति पुढे मांडल्या आहेत, त्या नेहमीच स्वीकारार्ह असतात असा अर्थ मात्र माझ्या वरील विधानांत अभिप्रेत नाही. उदाहरणार्थ, विष्णु म्हणजे मूळची 'अवकाशदेवता' हें ओल्डेनबेर्गने प्रतिपादिलेलें मतच घ्याना विष्णूच्या सुविख्यात तीन पदन्यासांची कल्पना केवळ अवकाशविस्ताराची द्योतक आहे या ओल्डेनबेर्गच्या मतास वैदिक पुराव्याने पुष्टि मिळत नाही. विष्णूच्या तीन पदन्यासांनी, सूर्याचा चरणक्रम सूचित होतो हें म्हणणें सयुक्तिक नाही असा ओल्डेनबेर्गचा दावा आहे. कारण, ते तीन पदन्यास सकाळ, मध्याह्न, आणि सध्याकाळ यांच्याशीं मुळींच जुळणारे नाहीत. पण ओल्डेनबेर्गचा हा आक्षेप अगदी व्यर्थ आहे. विष्णूचे तीन पदन्यास सूर्याच्या उदय, आकाशमध्यस्थिति, आणि अस्त या अवस्थांशीं सदृश नाहीत ही गोष्ट मलाहि मान्य आहे. पण मी पुढे असें दाखविणार आहें की ते तीन पदन्यास सूर्याचीच एक दुसरी अगदी भिन्न पण वैशिष्ट्यपूर्ण अशी क्रिया दर्शवितात. ओल्डेनबेर्गने 'उरुगाय' या शब्दाचा अर्थ 'विस्तृत अवकाशाचा स्वामी' असा केलेला दिसतो. वास्तविक पाहतां त्या शब्दाचा अर्थ 'विस्ताराचें आक्रमण करणारा' असा आहे. ओल्डेनबेर्गने आपल्या विष्णुविषयक उपपत्तींत अवकाशविस्तारावर जो येवढा भर दिलेला

आहे, त्याला पुरावा म्हणजे केवळ प्रासंगिक यज्ञीय उल्लेखांचा; प्रत्यक्ष ऋग्वेदांतील वर्णनांचा नाही! विष्णूचें प्रधान कार्य म्हणजे या विश्वांतील अवकाश निर्माण करणें हेंच आहे असें ओल्डेनबेर्ग आणि गेल्डनेर यांसारखे[१७] पंडित जेव्हा म्हणतात तेव्हा त्यांना विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांतील सौर अंशांची चांगलीशी संगति लावतां येत नाही. मोनिअर वुइल्यम्सच्या मतें 'विष्णु' हा शब्द 'विश्' या धातूपासून साधित झालेला आहे. आणि त्या व्युत्पत्तीच्या आधारें त्या पंडिताने पुढे असें प्रतिपादिलें होतें की विश्वांतील भौतिक वस्तूंत विष्णु आपल्या सारयुक्त शक्तींचें 'आवेशन' करतो—आपली शक्ति त्या वस्तूंत घालतो. आणि या दृष्टीने पाहतां या अनंत विश्वांतील अवकाशाचें दैवतीकरण विष्णूच्या रूपाने केलें गेलें असणें असंभवनीय नाही. परंतु विष्णुविषयक वैदिक उल्लेखांचा अधिक खोलवर विचार केल्यावर, मोनिअर वुइल्यम्सला त्या देवतेच्या सौर स्वरूपाची खात्री पटली.[१८] हिलेब्रांटच्या बाबतींतहि असेंच झालें. त्या पंडिताला विष्णूच्या सौर स्वरूपाविषयी प्रथमतः मोठी शंका वाटत होती. परंतु शवटीं त्याचेंहि मत असें बनलें की, वैदिक दैवतशास्त्रांत विष्णूच्या व्यक्तिमत्त्वाचे जे विशेष प्रामुख्याने दिसून येतात त्यांचा अन्वय त्या देवतेच्या सौर स्वरूपाच्या आधारेंच योग्य प्रकारें आणि सयुक्तिकपणें लावता येईल.[१९] ओल्डेनबेर्गच्या उपर्युल्लिखित आक्षेपाला उत्तर म्हणून हॉपकिन्सने असें ठामपणें म्हटलें आहे की विष्णूला सूर्यदेवता मानलें जातें तें सूर्यप्रधान दैवतशास्त्राचा पगडा वेदाभ्यासकांच्या

(१७) K. F. GELDNER. *Vedismus und Brahmanismus*, 34

(१८) Monier WILLIAMS *Hinduism*, 101 ff.

(१९) A. HILLEBRANDT. *VM* III, 347–61; *VM* (kl. A.), 137–40.

मनावर आहे म्हणून नाही, तर ऋग्वेदांत त्या देवतेसंबंधी जे कांहीं थोडे निर्देश आले आहेत त्यांवरून ती एकच उपपत्ति समाधानकारक होऊं शकते म्हणून ![२०]

ऋग्वेदांतील विष्णूच्या स्वरूपाविषयी इतर अनेक उपपत्ति पंडितांनी पुढे मांडल्या आहेत. योहान्सनच्या मतें, विष्णु हा 'पितरांचा आत्मा' असला पाहिजे[२१]; तर विष्णु ही विद्युद्देवता असली पाहिजे असें मत घोष यांनी पुढे मांडलें आहे[२२] विष्णु ही देवता, अगदी प्राचीन कालापासून, एखाद्या अमूर्त तात्त्विक कल्पनेची, abstract conception ची, द्योतक असली पाहिजे असें याकोबींचें या बाबतींत म्हणणें आहे[२३]. रूडोल्फ ओटो म्हणतो की मूलतः अनेक विष्णु कल्पिले असले पाहिजेत आणि ते निरनिराळ्या शक्तींचे प्रतिनिधि म्हणून मानले जात असावेत.[२४] दास यांनी विष्णूचें इजिप्शियन देवता बेस हिच्याशीं साद्दश्य असल्याचें दर्शविलें आहे.[२५] हार्डी[२६] आणि कुनिके[२७] यांनी

(२०) Hopkins. *JAOS* XVI, 1894, cxlvii. ब्लूमफील्डनेहि विष्णु म्हणजे सूर्यदेवताच हें मत स्पष्टपणें मांडलें आहे (*Rel. of the Veda*, 169).

(२१) Johansson. *Solfageln i Indien*, 8 ff.

(२२) N. N. Ghose. *Aryan Trail in India and Iran*, 62.

(२३) H. Jacobi. "Über Visnu–Krsna–Vāsudeva."

(२४) R. Otto. *Gottheit und Gottheiten der Arier*, 83–91.

(२५) A. C. Das. *Rig-Vedic India* I, 254.

(२६) Hardy. *Vedische–Brahmanische Periode*, 33 ff.

(२७) H. Kunike. *Visnu, ein Mondgott*, Leipzig. 1916.

विष्णु ही चन्द्रदेवता असली पाहिजे असें सुचविलें आहे. बार्नेटच्या मतें मूळचा विष्णु म्हणजे यागविधीचें देवतास्वरूप आहे.

या विविध उपपत्तींचा अगदीं बरवर विचार केला तरी असें दिसून येईल की त्या पुढें मांडणाऱ्या विद्वानांनी ऋग्वेदांत विष्णूच्या व्यक्तिमत्त्वासंबंधी जे निर्देश स्पष्टपणें केलेले आहेत त्यांकडे पुरेसें लक्ष पुरविलेलें नाही; आणि म्हणून त्या उपपत्ति मुळींच प्रत्ययदायी वाटत नाहीत.

सामान्यतः, वैदिक पुराव्यावरून, विष्णूचें सौर स्वरूपच प्राधान्यानें सिद्ध होतें हें आतापर्यंत आपण पाहिलें. पण त्यामुळें, विष्णूचे तीन पदन्यास म्हणजे सूर्याच्या उदय, आकाशमध्यस्थिति, आणि अस्त या तीन अवस्था हें समीकरण स्वीकारलेंच पाहिजे असें मात्र समजून चालणार नाही. विष्णूच्या तिसऱ्या पदन्यासासंबंधी वेदांत असें म्हटलें आहे की तो अतिशय उच्च स्थानीं पडला असून, तेथूनच उच्चतम आणि अद्भुत असा विश्वास प्रारंभ होतो. हें वर्णन सूर्यास्तास मुळींच लागूं पडत नाही हें सांगावयास नकोच. 'अतिशय उच्च स्थानीं संचार करूं शकणारे पक्षीहि विष्णूच्या तृतीय, म्हणजेच परम, पदास पोंचू शकत नाहीत' (१.१५५.५), 'त्या तृतीय पदीं मधाचा झरा आहे' (१.१५४.५) आणि 'तेथेच देव आनंदाने राहतात' (८.२९.७) या आणि एतत्सदृश दुसऱ्या अनेक निर्देशांचा संबंध

(७८) विष्णु ही सूर्यदेवता आहे या सिद्धान्ताच्या आधारें श्राडर यानें हिंदूंच्या देवतात्रयीसंबंधी एक मौलिक उपपत्ति सुचविली आहे. त्याच्या मतें भारतीय देवतशास्त्रांत मुख्यतः तीन विचारप्रवाह आहेत—निसर्गपूजा, अमूर्ततत्त्वपूजा, आणि लौकिकदेवतापूजा. या तीन विचारप्रवाहांचे द्योतक असे अनुक्रमें विष्णु, ब्रह्मा, आणि शिव हे तीन देव आहेत. भारतीयांची देवतात्रयी म्हणजे देवतशास्त्रांतील या तीन प्रमुख विचारप्रवाहांच्या ऐक्याचें प्रतीक आहे. विष्णूचें मूळचें स्वरूप – जें निःसंशय निसर्गदेवतेचें आहे – ध्यानांत घेतलें तर ही उपपत्ति प्रत्ययदायी नाही असें आढळून येईल.

सूर्यास्ताशीं कसा लावतां येईल?[29] और्णवाभाचें जें मत वर उल्लेखिलेलें आहे, आणि ज्या मताचा रोट, केगी, मॅक्स म्यूलर इत्यादि आधुनिक विद्वानांनीहि अनुवाद केलेला आहे, त्या मताप्रमाणे विष्णूचें दुसरें पद – म्हणजे आकाशमध्यस्थिति, हेंच त्याचें उच्चतम पद, परमपद, समजावयास पाहिजे. पण वेदांत तसें वर्णन कुठेंहि आलेलें नाही. विष्णूच्या तिसऱ्या पदन्यासाच्या स्थानीं, मृत झालेल्या पुण्यात्म्यांची वसति असते असें ऋग्वेदांतील कांहीं उल्लेखांत म्हटलें आहे (१.१५४.५६; ५.३.२). हॉपकिन्सने या गोष्टीवर विशेष भर दिलेला आहे. विष्णूचें परमपद म्हणजे पुण्यात्म्यांचें सौरमंदिर! आणि हीच कल्पना वेदोत्तर वाङ्मयांतहि सापडतें असें हॉपकिन्सचें म्हणणें आहे.[30] पुण्यात्म्यांच्या सौरमंदिराविषयीची ही कल्पना वेदांत विष्णुविषयक कल्पनेशीं इतक्या स्पष्टपणें आणि साहजिकपणें निगडित झालेली आहे कीं तिच्याकडे सहजासहजीं दुर्लक्ष करतां येणार नाही. या दोन कल्पनांच्या परस्परसंबंधावरून दोन गोष्टी मुख्यतः सिद्ध होतात. पहिली म्हणजे, वैदिक विष्णूच्या व्यक्तिमत्वांत सौर अंश प्रमुख आहेत ही. आणि दुसरी म्हणजे, त्याचें परमपद हें आकाशाच्या उच्च भागीं असलें पाहिजे ही. 'आपल्या तीन पदन्यासांच्या योगें विष्णूने अखिल विश्वाचें आक्रमण केलें' (१ १५४ २), 'या पदन्यासांचा प्रारंभ पृथ्वीवर होतो' (१.२२.१९) व 'अंत उच्चतम आकाशांत होतो'

(२९) विष्णूच्या परमपदासंबंधीं वेदांत जी एक प्रकारची अस्पष्टता आढळून येते त्यामुळे एखाद्या परमोच्च देवतेस आवश्यक अशी अद्भुतता विष्णूच्या व्यक्तिमत्वांत निर्माण झाली आहे असें मत डॉ. रामकृष्ण भांडारकर यांनी प्रदर्शित केलें आहे (*Vaisnavism and S'aivism*, 47). परंतु अधिक सोलवट विचार केल्यास त्या पदासंबंधीं फारशी अस्पष्टता नाही असेंच दिसून येईल.

(३०) HOPKINS. *R. of I.*, 56.

(१·१५४५)–इत्यादि विष्णूच्या पदन्यासांसंबंधी जे उल्लेख ऋग्वेदांत आले आहेत, त्यांचा चिकित्सापूर्ण विचार केला असतां, त्या पदन्यासाचें ओर्णवाभानें केलेलें निसर्गघटनात्मक स्पष्टीकरण मान्य होण्यासारखें नाही. त्यांवरून सूर्याचें एका क्षितिजापासून दुसऱ्या क्षितिजापर्यंतचें परिभ्रमण मुळींच सूचित होऊं शकत नाही. विष्णुविषयक दैवतशास्त्रांतील या प्रधान घटनेचा अर्थ एकच होऊ शकतो. *विष्णूच्या रूपानें* वैदिक कवींनी एका शीघ्रगामी तेजःशक्तीचें चित्र निर्माण केलें आहे. ती शक्ति आपल्या तीन पदांनी अनुक्रमें पृथ्वी, अन्तरिक्ष, आणि आकाश हे अखिल विश्वाचे तीन विभाग आक्रांत करते असें त्यांनी दर्शविलें आहे. वैदिक विश्वविज्ञानास ( Vedic cosmography ) हे तीन विभाग चांगलेच परिचित आहेत. निरुक्तकार यास्कांनी उद्धृत केलेल्या शाकपूणीच्या मताचा हाच अर्थ आहे, आणि शाकपूणींचेच मत हल्ली सामान्यतः मान्य धरलें जातें. ऋग्वेदांतील व तदुत्तर वैदिक वाङ्मयांतील पुराव्यावरून[31] विष्णूच्या तीन पदन्यासाचा हाच अर्थ स्पष्टपणें सिद्ध होतो. त्या पदन्यासाना आधारभूत असलेली कल्पना म्हणजे *क्षितिजापासून, अन्तरिक्षाच्या मार्गानें, आकाशमध्य*-स्थानीं असलेल्या सौरमंदिरापर्यंत–वैदिक परमानंदपदापर्यंत–होणाऱ्या सूर्याच्या दैनंदिन गतीची[32] दर्शपूर्णमास यागांत यजमानाला कराव्या लागणाऱ्या विष्णुक्रमांवरूनहि[33] विश्वाच्या या तीन विभागांची कल्पनाच

(३१) वा स. २.१७, तै स. १.३.५.४, श प. ब्रा १.९.३.९, ६.७.४.७.

(३२) टिळकांच्या मतें ( *The Arctic Home in the Vedas*, 326 28) विष्णूचीं तीन पदें सूर्याच्या वार्षिक गतिक्रमाचे तीन भाग दर्शवितात. अलीकडे शामशास्त्री यांनीहि विष्णूच्या तीन पदांचें ज्योतिषशास्त्राच्या आधारें स्पष्टीकरण केलें आहे (R SHAMASASTRI "Visnu's three strides " *Ashutosh Vol.* III; ' Visnu's Strides" *PAIOC* IX, 1937). त्यांच्या मतें विष्णूचीं पाउलें चढत्या छायांचीं निदर्शक आहेत

(३३) सुदगाय हि लोकाय विष्णुक्रमा क्रमयन्ते– तै स १.७.६.१

सूचित होते. वैदिक विष्णूच्या द्वारा, वैदिक कवींना, सामान्य स्वरूपांतील सूर्यदेवतेचा निर्देश अभिप्रेत नाही. तर त्यांनी सूर्यदेवतेच्या एका विशिष्ट धर्माचा—म्हणजे तिच्या शीघ्रगतित्वाचा—दैवतशास्त्रीय पद्धतीने, विष्णूच्या तीन पदन्यासांच्या कल्पनेच्या द्वारा, गौरव केलेला आहे. ग्युंटर्ट या नुकत्याच दिवंगत झालेल्या जर्मन पंडिताने तर असें सुचविलें आहे[३९] की विष्णूच्या पदन्यासांच्या कल्पनेंत सूर्यदेवतेच्या विलोमगतीची—म्हणजे परमानंदपदापासून, अन्तरिक्षाच्या मार्गानें, क्षितिजापर्यंतच्या गतीची—कल्पनाहि अभिप्रेत आहे. विष्णु आपल्या तीन पदन्यासांच्या योगें आकाशमध्यबिन्दुपर्यंतच्या अवकाशाचें, अत्यंत शीघ्रतेने आक्रमण करूं शकतो. म्हणजेच तेजःपूर्ण परमानंदपदास पोंचणारा ह्रस्वतम आणि सुलभतम मार्ग एकट्या विष्णूलाच अवगत आहे. आणि म्हणून, अवश्य तेव्हा, विष्णु, लोकांचा रक्षणकर्ता या नात्याने, आपल्या परमानंदपदापासून पृथ्वीवर अवतरतो, व पुन्हा आपल्या परमानंदपदीं परत जातो. विष्णूच्या अवतारांसंबंधींच्या कल्पनेचीं बीजें त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वांतील या विशेषांतच सापडू शकतील.

अवतारकल्पनेचा विषय निघालाच म्हणून त्यासंबंधीं येथे थोडें विवेचन करणें अवश्य आहे. ऋग्वेदांत 'अवतारा'चा असा उल्लेख कुठेहि आढळत नाहीं. पण वर सूचित केल्याप्रमाणे, त्या कल्पनेचीं काही बीजें मात्र, वैदिक वाङ्मयांत, निश्चितपणें सापडू शकतील. एका देवतेच्या दुसऱ्या देवतेशीं असलेल्या सारूप्यासंबंधीं, तसेंच भिन्न देवतांच्या समीकरणांसंबंधीं, अनेक उल्लेख वेदांत आलेले आहेत आणि या उल्लेखांतच अवतारकल्पनेचा उगम आहे असें म्हणावयास कांहीच प्रत्यवाय नाहीं[४०] ब्राह्मणवाङ्मयांत तर कांही देवतांचें कांही वस्तूंशीं सारूप्य

(३९) Güntert. *Der arische Weltkönig*, 296.
(४०) Macdonell. *JRAS*, 1895, 115-189.

असल्याचें ध्वनित केलेलें आहे. विशेषतः, वैदिक विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांत असे दोन विशिष्ट धर्म आहेत की त्यांचा विकास अगदी अपरोक्षपणें अवतारकल्पनेंत व्हावा. ऋग्वेदांतील सातव्या मंडलांतील शंभराव्या सूक्ताच्या पहिल्या ऋचेंत असें म्हटलें आहे की, विष्णु हा स्वतःच्या नेहमीच्या रूपाहून भिन्न असें रूप धारण करूं शकतो. आणि ऋग्वेदांतील सहाव्या मंडलांतील एकोणपन्नासाव्या सूक्ताच्या तेराव्या ऋचेंत असें म्हटलें आहे कीं, विष्णु हा संकटग्रस्त मानवजातीला साहाय्य करण्यासाठीं आपला तीन पदन्यासांचा पराक्रम करतो. वेदोत्तर पुराणशास्त्रांतील, विष्णूच्या कांहीं विशिष्ट अवतारांचीं बीजेंहि वेदांत सांपडतात. उदाहरणार्थ, ऋग्वेदांत पौराणिक विष्णूच्या वामनावताराचा उल्लेख आलेला नसला तरी त्या विशिष्ट अवतारकल्पनेस आधार म्हणजे वैदिक विष्णूच्या तीन पदन्यासांचाच असला पाहिजे. ब्राह्मणवाङ्मयांत तर हा संबंध कांहीं ठिकाणीं (तै. सं. ६. २. ४; श. प. ब्रा. १. २. ५.; ऐ. ब्रा. ६.१५) स्पष्टपणें सूचित केलेला आहे.[३६] तसेंच पौराणिक विष्णूच्या

(३६) विष्णूच्या वामनावताराविषयीं अनेक भिन्न भिन्न मतें विद्वानांनी प्रदर्शित केलीं आहेत. कुनचें म्हणणें असें आहे की विष्णूचें वामनरूप हें सं याकाळीं संकुचित होणाऱ्या सूर्यप्रकाशाचें द्योतक आहे ( *Über Entwicklungsstufen der Mythenbildung*, 128 ) वामनकल्पनेचा संबंध ओल्डेनबेर्गने अवश्य तेव्हा लहान रूप धारण करूं शकणाऱ्या एखाद्या प्रचंड राक्षसाच्यासंबंधीच्या लोककथेशीं लावला आहे ( *Religion des Veda*, 233). असुरांना फसविण्यासाठींच केवळ माया म्हणून विष्णूनें वामनरूप धारण केलें असें कीथ ( *Rel. Phil. Veda Up.*, 111), हिलेब्रांट ( *VM*, kl. A., 139 ), आणि मॅक्डोनेल ( *JRAS* 1895, 165–189 ) यांचें मत आहे. मॅक्निकल म्हणतो ( *Indian Theism* ) की अल्पत्वापासूनहि अवश्य तेव्हा प्रचंड शक्ति निर्माण होऊं शकते हेंच वामनावताराचें नीतिशास्त्रात्मक तात्पर्य आहे. विष्णूचें वामनस्वरूप म्हणजे पृथ्वीवरील यागीय अग्नि, आणि तोच

[ पान १३१ वर पहा ]

वराहावताराचीं कांहीं अस्पष्ट चिन्हेंहि ऋग्वेदांत (१. ६१. ७; ८. ७७. १०) आणि तदुत्तर वैदिक वाङ्मयांत (तै. सं. ७. १. ५. १; तै. ब्रा. १. १. ३. ५; तै. आ. १०. १. ८; श. प. ब्रा. १४. १. २. ११) दृष्टीस पडतात.[३७]

ऋग्वेदांतील उल्लेखांत स्पष्टपणें सूचित केल्या गेलेल्या गौण स्थानापासून हिंदु दैवतशास्त्रांतील सर्वश्रेष्ठ देवता म्हणून मानला जाण्यापर्यंत विष्णूचें माहात्म्य कां वाढत गेलें असावें याचा विचार आपणांस पुढे करावयाचाच आहे. पण या ठिकाणीं त्यासंबंधींच्या दोन गोष्टी लक्षांत घेणें अवश्य आहे. एक अशी कीं, वेदोत्तर कालांत विष्णूला मिळालेल्या उच्चस्थानाचें कारण म्हणजे ऋग्वेदांत सामान्यपणें प्रकट झालेलें त्याचें सौर स्वरूप हें निश्चितपणें नव्हे. कारण, एखाद्या सामान्य सूर्यदेवतेची अशा प्रकारें दैवतशास्त्रीय उन्नति होऊं शकेल ही कल्पना फारशी प्रत्ययदायी वाटत

---

[पान १३० वरून चालू]

आणि अन्तरिक्षाचें व आकाशाचें अनुक्रमें विद्युत् व सूर्य यांच्या रूपानें आक्रमण करतो असें आय्यंगार यांचें म्हणणें आहे (*Essays on Indo-Aryan Mythology* II, 253–82). ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीनें शामशास्त्री यांनी विष्णूच्या वामनस्वरूपाचा संबंध संकुचित छायेशीं लावला आहे ("Viṣṇu's incarnations". *PAIOC* IX, 1937).

(३७) मॅक्डोनेलच्या मतें (उपर्युल्लिखित लेख, पान १६६ पहा) मत्स्यावतार आणि कूर्मावतार यांचीं बीजें शतपथब्राह्मणांत सांपडतात, पण विष्णूचा त्यांच्याशीं कांहीं संबंध असल्याचें दिसत नाहीं. विष्णूच्या मत्स्यावताराचा प्रारंभ आणि प्राथमिक विकास सैन्धवी संस्कृतीच्या कालांत झाला असावा असें करमरकरांचें म्हणणें आहे (*Kane Comm. Vol.*, 253–57). अवतार-कल्पनेसंबंधीं कोसंबी यांचा पुढील लेख पाहण्यासारखा आहे: "The Avatāra Syncretism and Possible Sources of the *BG*." *JBBRAS* 24–25, 121–131.

नाही. या उन्नतीचें कारण एकच असूं शकेल; आणि तें म्हणजे, मागे सुचविल्याप्रमाणे, कांहीं वैदिक (किंवा अवैदिक?) भारतीयांच्या कुलांत विष्णु ही प्रथमपासूनच सर्वश्रेष्ठ देवता गणली गेली असली पाहिजे. त्या देवतेचा प्रवेश 'अधिकृत' वैदिक देवतामण्डलांत करून घेण्यांत आला त्यावेळीं वैदिक कवींनी, कांहीं विशिष्ट कारणांमुळे, तिच्या मूळ स्वरूपांतील कांहीं अंश हेतुपुरस्सर दडपून टाकले असले पाहिजेत, आणि त्या देवतेवर, तिच्या मूळ स्वरूपावरूनच परोक्षतया सूचित होणारें, सौरस्वरूप लादलें असलें पाहिजे; आणि त्या सौर-स्वरूपाचाच पुढे विस्तार केला असला पाहिजे. परंतु मूळच्या विष्णुपर्यायांना पुढे धर्म-कारणांत महत्त्व प्राप्त झालें असलें पाहिजे. आणि त्याबरोबरच त्यांच्या प्रमुख देवतेचें माहात्म्यहि प्रस्थापित झालें असलें पाहिजे. दुसरी गोष्ट अशी की, वेदोत्तर काळांत घडून आलेल्या विष्णूच्या देवतशास्त्रीय उन्नयनाचीं कांहीं चिन्हें ब्राह्मणवाङ्मयांतहि दिसून येतात. उदाहरणार्थ, शतपथ ब्राह्मणांत (१४-१-१-५) विष्णूचा सर्वश्रेष्ठ देवता म्हणून उल्लेख केलेला आहे; आणि ऐतरेय ब्राह्मणांत (१-१) 'अग्निर्वै देवानां अवमः, विष्णुः परमः, तदन्तरेण सर्वाः देवताः' असा उल्लेख आलेला आहे. तसेंच प्रथमतः जरी वैदिक यागांत विष्णूचें स्थान गौण प्रकारचें मानलें गेलें असलें तरी कालान्तराने अशी परिस्थिति निर्माण झाली की, जेव्हा विष्णु म्हणजेच अखिल याग या समीकरणाचा स्वीकार करण्यांत आला. अर्थात् याचा अर्थ असा नाही की, पुराणवाङ्मयांत सूचित केलेलें श्रेष्ठपद विष्णूला ब्राह्मणकाळांतच प्राप्त झालें होतें. त्या घटनेच्या प्रक्रियेस प्रारंभ झाला होता येवढेंच फार तर म्हणतां येईल. एक गोष्ट मात्र निश्चित, आणि ती म्हणजे ही की विष्णूचें माहात्म्य जसजसें वाढत गेलें, तसतसें इन्द्राचें माहात्म्य कमीकमी होत गेलें. याचीच परिणति म्हणजे महाभारतांत स्पष्टपणें निर्देशिलेलें विष्णूचें इन्द्रावरील श्रेष्ठत्व! 'अशा प्रकारें, विष्णुप्रधान देवतशास्त्राने पुढे इन्द्रप्रधान देवतशास्त्रावर मात केली!!

विष्णूचें हें मूळ स्वरूप होतें तरी काय ? या प्रश्नाचा आता आपण विचार करूं. प्रथमतः 'विष्णु' या शब्दाचा भाषाशास्त्रदृष्ट्या विचार करून त्यामुळे या प्रश्नावर काय प्रकाश पडतो तें पाहूं. 'विष्णु' हा शब्द 'विष्' (= व्यवसायी, सततोद्योगी, क्रियाशील असणें) या धातूपासून साधित झालेला आहे असें सामान्यपणें मानण्यांत येतें. मॅकडोनेल, केगी, श्राडर, इत्यादि पंडितांनी[३८] याच व्युत्पत्तीचा स्वीकार केलेला आहे. या व्युत्पत्तीच्या आधारें, विष्णूचे — म्हणजेच सूर्यदेवतेचे — शीघ्र आणि क्रियाशील व्यापार चांगल्या रीतीनें सिद्ध होतात, असें त्यांचें म्हणणें आहे. 'विष्णु' या शब्दांतील मूळ धातु 'विष्' हा नसून 'विश्' (= प्रवेश करणें, शिरणें, व्यापणें) हा आहे असें दुसऱ्या कांहीं विद्वानांचें मत आहे. पौराणिक वाङ्मयांत ही दुसरीच व्युत्पत्ति सामान्यपणें स्वीकारली गेली आहे; आणि, जगाची उत्पत्ति करून, त्यांत तो 'शिरला', त्यानें तें जग व्यापिलें, म्हणून तो 'विष्णु' असें त्या नांवाचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केलेला आहे.[३९] पण या दोन्ही व्युत्पत्तींसंबंधीं असा प्रश्न पडतो की, 'विष्णु' हा शब्द साधतांना आगम कोणता लागला, आणि व्याकरण-दृष्ट्या तें रूप कसें बनलें ? ही अडचण ब्लूमफील्डने सुचविलेल्या व्युत्पत्तीमुळे अंशतः दूर झाली आहे[४०]. ब्लूमफील्डच्या मतें 'विष्णु' या शब्दांत दोन भाग आहेत—'वि' (उपसर्गाच्या अर्थी = मधून, through) आणि 'स्नु' (म्हणजेच सानु किंवा पृष्ठभाग). 'विष्णु', या शब्दानें त्या देवतेनें विश्वाच्या पृष्ठभागामधून केलेले पदन्यास सूचित होतात. 'विष्णु' म्हणजे 'पृष्ठभागांतून आक्रमण करणारा —

(३८) MACDONELL. *VM*, 37–42; KAEGI. *The Rigveda*, 56; SCHROEDER. *Ar. Rel.* II, 10.

(३९) 'विष्णुसहस्रनामा'चा टीकाकार म्हणतोः 'चराचरेषु भूतेषु वेशनाद् विष्णुरुच्यते'. तसेंच, 'विशतेः वा नुक्प्रत्ययस्य रूपं विष्णुरिति'.

(४०) BLOOMFIELD. *The Rel. of the Veda*, 168.

पृष्ठभाग भेदून जाणारा'! ब्लूमफील्डने आपण सुचविलेल्या व्युत्पत्तींत, 'वि' या उपसर्गाचा अर्थ 'मधून' किंवा 'भेदून' असा केलेला आहे. पण तो मुळींच पटण्यासारखा नाही. ग्युंटर्टनेहि, 'विष्णु' या शब्दाचें विश्लेषण 'वि + स्नु (= सानु)' असेंच केलेलें आहे[४१] पण त्याने 'वि' या शब्दाचा अर्थ मात्र नेहमीचाच म्हणजे 'एकमेकां-पासून विलग', 'पृथक्' असा घेतलेला आहे. त्याच्या मतें 'विश्वाचीं दोन तळें किंवा पृष्ठें विलग करणारा' तो विष्णु. 'विष्णु' या शब्दाचें विश्लेषण 'वि'+'स्नु' (सानु) असें केलें म्हणजे त्या शब्दाचे मुख्यतः तीन अर्थ संभवतात: (१) ज्याचे सानु म्हणजे पृष्ठभाग विलग आहेत असा; (२) ज्याच्यासाठी सानु–विश्वाचे सानु–विलग झाले आहेत असा; आणि (३) सानुविहीन किंवा सानु नसलेला. परंतु वेदांत प्रत्यक्षपणें वर्णिलेलें किंवा वैदिक उल्लेखांवरून परोक्षपणें जाणता येणारें विष्णूचें स्वरूप लक्षांत घेतलें तर वरील तीन अर्थांपैकी एकहि अर्थ त्या स्वरूपाशीं अनुरूप असा होत नाही त्यामुळे ब्लूमफील्डने सुचविलेली व ग्युंटर्टने स्वीकारलेली व्युत्पत्ति समाधानकारक वाटत नाही. शिवाय अशा रीतीनें, कृत्रिमपणें, बनविलेला एखादा शब्द, प्राचीन काळीं, कांही लोकांत श्रेष्ठ गणल्या गेलेल्या देवतेचें नामाभिधान होऊं शकेल हें संभवनीय वाटत नाही. माझ्या मतें, 'विष्णु' या शब्दाची समाधानकारक व्युत्पत्ति द्यावयाची असेल तर तो शब्द 'वि' या धातूपासून साधावयास पाहिजे. 'वि' या धातूला 'स्नु' हा प्रत्यय लागून हा शब्द सिद्ध झाला आहे 'जिष्णु,' 'अलंकरिष्णु', 'क्षेष्णु,' वगैरे रूपेंहि अशींच सिद्ध झालेलीं आहेत. भाषाशास्त्रदृष्ट्या 'वि' हा धातु मूळ यूरोभारतीय *uei (= उडणें) या धातूशीं संबद्ध आहे. याच यूरोभारतीय धातूशीं संबद्ध असलेले इतर यूरोभारतीय भाषांतील शब्द म्हणजे, अवेस्ता–*vis*; लॅटिन–*avis*, प्राचीन उच्च जर्मन–*wo*,

(४१) Guntert. *Der arische Weltkonig*, 306 ff.

नूतन उच्च जर्मन-*weih*, वगैरे आहेत. तेव्हा 'विष्णु' या शब्दाचा मूळ अर्थ 'उडणारा' असाच असला पाहिजे असें मला वाटतें.[४२] विष्णु म्हणजे पक्षी हा अर्थहि प्राचीन काळीं प्रचलित असणें अगदीच असंभवनीय नाही. विष्णु या देवतेचें मूळचें प्रतीक 'पक्षी' हेंच असलें पाहिजे असा यावरून निष्कर्ष निघूं शकतो. आणि, विष्णूच्या या मूळच्या पक्षिरूपावरूनच वैदिक कवींना पुढची—म्हणजे विष्णु म्हणजे सूर्य-पक्षी ही—कल्पना सुचली असली पाहिजे. सूर्यावर पक्षिस्वरूपाचा आरोप करणें ही गोष्ट सर्व प्राचीन दैवतशास्त्रांना चांगली परिचित अशीच आहे. उदाहरणार्थ, लेटिश दैवतशास्त्रांतील सूर्यदेवता 'ऊसिग' हिचें 'लार्क' या पक्ष्याशीं सारूप्य स्पष्टपणें सूचित केलें गेलें आहे[४३]. कांही प्राचीन दैवतशास्त्रांत, सूर्याचें वर्णन 'उडणारा घोडा' या रूपांतहि केलेलें आहे. आणि विष्णूच्या 'हयशिरस्' किंवा 'हयमुख' या नांवाचा खोलवर विचार केला तर विष्णूच्या वर्णनांतहि या रूपाचा अंश—अस्पष्टपणें का होईना पण—असला पाहिजे असें वाटल्यावाचून राहात नाही. दैवतशास्त्रीय कल्पनांच्या विकासक्रमांतील एक अगदी प्राथमिक अवस्था अशी असली पाहिजे की ज्यावेळीं अत्यंत शीघ्रतेने अखिल विश्वाचें—त्याच्या तीन विभागांचें—आक्रमण करणारी अशी एखादी देवता कवींनी कल्पिली होती. आणि या कल्पनेशीं संबद्ध, व त्यावेळच्या विचारसरणीस अनुरूप, अशी दुसरी कल्पना म्हणजे ती देवता पक्षिस्वरूप असली पाहिजे ही होय. कारण, अत्यंत शीघ्रगति प्राणी म्हणजे पक्षी. इतर प्राचीन लोकांप्रमाणे, वैदिक कवींनीहि सूर्यदेवतेचा पक्षिस्वरूपांत निर्देश केला; आणि ती पक्षिस्वरूप सूर्यदेवता म्हणजेच विष्णु!

---

(४२) पहा: BLOCH. *Worter und Sachen* I, 80 ff.; HILLEBRANDT. *VM* (kl. A.), 140; HOPKINS. *Epic Mythology*, 203; JOHANSSON. *Dhiṣaṇā etc.*, 47–48.

(४३) SCHROEDER. *Ar. Rel.* II, 10. fn. 1.

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत (१०-१४९-३) 'सुपर्णो अङ्ग सवितुर्गरुत्मान् पूर्वो जातः' असा उल्लेख आलेला आहे. ब्लोक या पंडिताने या व एतत्सदृश इतर उल्लेखांचा चिकित्सापूर्वक विचार करून अशी उपपत्ति पुढे मांडली आहे की हा वैदिक सुपर्ण म्हणजे सूर्य-पक्षीच असला पाहिजे[४४]. याविषयी वैदिक आणि वेदोत्तर वाङ्मयांत जे जे निर्देश आले आहेत त्यांचा विश्लेषणपूर्वक, चिकित्सापूर्ण, व सर्वसमावेशक असा अभ्यास आणखी दोघां पंडितांनी केलेला आहे—योहान्सन याने आपल्या *Solfageln i Indien* (भारतांतील सूर्य-पक्षी) या ग्रंथांत; आणि शार्पेन्तिए याने आपल्या *Die Suparna-Sage* (सुपर्णकथा) या ग्रंथांत. त्यांनी आपल्या एतद्विषयक विवेचनावरून तीन *अगदीं प्रत्ययदायी असे निष्कर्ष काढले आहेत*: (१) ऋग्वेदांतील 'सोमाचें अपहरण' या कथेंत जो पक्षी उल्लेखिलेला आहे तो विष्णुच असला पाहिजे; (२) हा पक्षी म्हणजेच वैदिक सुपर्ण, आणि सुपर्णाख्यायांत व पुराणांत वर्णिलेला गरुड; (३) गरुड हें विष्णूचें प्रिय वाहन; पण मूलतः तें विष्णूचेंच एक रूप असलें पाहिजे. 'वाहन' आणि 'वाह्य' यांच्या मूळ सारूप्याची कल्पना प्राचीन दैवतशास्त्रास अपरिचित नाही. सारांश, मनुष्याचें डोकें असलेला हा पक्षी म्हणजेच विष्णूच्या मूळ स्वरूपाचें नंतरच्या दैवतशास्त्रांतील प्रतीक! योहान्सनने तर पुढे असें दाखविलें आहे की पौराणिक विष्णूचे 'श्रीवत्स', 'कौस्तुभ', 'चतुर्भुजत्व', नाभिकमल', इत्यादि जे विशेष आहेत, तेहि *त्याच्या मूळच्या पक्षिस्वरूपाचेच द्योतक असले पाहिजेत*.[४५]

आतापर्यंत आपण हें पाहिलें की, ऋग्वेदसूक्तांत, विष्णूला सामान्यतः सूर्यदेवता—पक्षिस्वरूपांतील सूर्यदेवता—मानण्यांत आलें आहे. आणि

(४४) Bloch. *WuS* I, 60 ff.

(४५) Johansson. *Solfageln i Indien*, 21 ff.; Charpentier. *Die Suparnasage*, 153 ff.

सूर्यदेवतेच्या, विश्वांतील तीन विभागांतून होणाऱ्या, आरोहण-अवतरणाचा गौरव विष्णूच्या तीन पदन्यासांच्या रूपाने वैदिक कवींनी केलेला आहे. परंतु येवढ्यावरून विष्णुविषयक जे मुख्य प्रश्न या व्याख्यानारंभीं सुचविले आहेत त्यांचें उत्तर मिळत नाही. विष्णु ही जर मूळचीच सूर्यदेवता असती तर, मागे वर्णिल्याप्रमाणे, 'अधिकृत' वैदिक देवतामंडलांत विष्णूचा प्रवेश करवून घेतांना, वैदिक कवींच्या मनांत विकल्प कां निर्माण झाले असते? विष्णूचा इन्द्राशीं जो अगदीं कृत्रिम आणि पल्लवग्राही स्वरूपाचा संबंध जोडला आहे त्याचा तरी दुसरा अर्थ काय होऊं शकेल? दुसरें असें की वेदांतील एखाद्या सूर्यदेवतेला वेदोत्तर दैवतशास्त्रांत अनन्यसाधारण असें श्रेष्ठस्थान प्राप्त होतें या घटनेचीं कोणतीं सयुक्तिक कारणें सांगतां येतील? शिवाय, कांहीं कारणांमुळे तसें घडलें असें जरी क्षणभर गृहीत धरलें, तरी अनेक सूर्यदेवतांपैकी विष्णूलाच तें स्थान कां प्राप्त झालें? या सर्व प्रश्नांचा विचार करूं लागलों म्हणजे आपणांस मीं मागे सुचविलेल्या उपपत्तीकडेच वळावें लागतें. ती उपपत्ति मी पुन्हा सांगतों. प्राचीन विष्णूच्या व्यक्तिमत्त्वांत, ऋग्वेदांत दिसून येणाऱ्या सौरस्वरूपाच्या अंशांपेक्षा, दुसऱ्या कुठल्या तरी अधिक महत्त्वाच्या स्वरूपाचे अंश मूलतःच अस्तित्वांत असले पाहिजेत. कांहीं कारणांमुळे, वैदिक कवींनी ते मूळ अंश हेतुपुरःसर दडपून टाकले असावेत, आणि त्या देवतेवर दुसऱ्याच — म्हणजे सौरस्वरूपाच्या — अंशांचा प्राधान्याने आरोप केला असला पाहिजे. पण आपल्यासारख्या चिकित्सक वेदाभ्यासकांच्या सुदैवाने, विष्णूच्या मूळच्या व्यक्तिमत्त्वाचे कांहीं अंश 'प्रतिष्ठित' वैदिक कवींच्या प्रयत्नास न जुमानतांहि — अस्पष्टतया का होईना पण — वैदिक वाङ्मयांत आणि यागविधींत आढळून येतात.

या बाबतींत सर्वांत महत्त्वपूर्ण शब्द म्हणजे 'शिपिविष्ट' हा होय. हा शब्द ऋग्वेदांत केवळ विष्णूच्या संबंधात उपयोजिलेला आहे. ऋग्वेदांतील ज्या उल्लेखांत हा शब्द आलेला आहे (७. ९९.७; ७. १००. ५ ७) ते उभेस यद्ध्याच गद्यापर्यंत दोघ असे [illegible]

असावेत. 'शिपिविष्ट' या शब्दाने विष्णूच्या व्यक्तिमत्त्वाच्या ज्या स्वरूपाचा बोध होतो त्या स्वरूपाचा निर्देश उघडपणें आणि स्पष्टपणें न करतां, गौणपणें आणि दुर्बोधपणें करणें वैदिक कवींना इष्ट वाटलें असावें. 'शिपिविष्ट' हा शब्द आतापर्यंत निरनिराळ्या रीतींनी व्युत्पादिला गेला आहे. उदाहरणार्थ, 'पशवः शिपिरिति श्रुत्यन्तरात् शिपिशब्दः पशुवाची' (तै. सं. ५.५.५); 'शिपयो रश्मयः तैः आविष्टः' (ताण्ड्य महाब्रा० ९.७.८ वरील भाष्य) निरुक्तांत (५.७) असें म्हटलें आहे की, 'शिपिविष्टो विष्णुरिति विष्णोर्द्वे नामनी भवतः। कुत्सितार्थीयं पूर्वं भवति इति औपमन्यवः'. तसेंच 'शेप इव निर्वेष्टितः अस्मि इति' असेंहि निरुक्तांत (५.८) निर्वचन दिलेलें आहे. महाभारतांत असें सांगितलें आहे की 'शिपिविष्टेति चाख्यायां हीनरोमा च यो भवेत्'; अर्थात् शिपिविष्ट म्हणजे 'टक्कल पडलेला.' ओल्डेनबर्गच्या मतेंहि 'शिपिविष्ट' या शब्दाचा अर्थ 'टक्कल पडलेला' किंवा 'त्वग्रोग असलेला' असाच असावा. हॉपकिन्सने महाभारताच्या अर्थाला पुष्टि दिलेली आहे. शार्पेन्तिए याने 'शिपिविष्ट' या शब्दाचा अर्थ 'केसाळ बुटका' (hairy dwarf) असा केलेला आहे. 'यत् क्षोदिष्ठं तत् शिपिविष्टम्' या वाक्याच्या आधारें गेल्डनेर याने 'शिपिविष्ट' हा शब्द विष्णूच्या वामनस्वरूपाचा द्योतक असावा असें मत प्रदर्शित केलें आहे.[४६] पण यांपैकी एकहि व्युत्पत्ति किंवा एकहि अर्थ

(४६) OLDENBERG. *RdV*, 233; HOPKINS. *Rel. of Ind.*, 56; CHARPENTIER. *KB*, 54; *WZKM* XXV, 427; *KZ* XLVI, 22; GELDNER. *Ved. Stud.* III, 81, fn. 1. सूर्य क्षितिजाखाली गेल्यामुळे कांही काळ अन्धकारांत लुप्त होतो ही निसर्गाची 'शिपिविष्ट' या शब्दाने दर्शविली आहे असें टिळक म्हणतात (उ. ग्रं., पान ३३१ व पुढे). शिपिविष्ट म्हणजे ज्याचीं किरणें रात्रीच्या वेळीं किंवा पावसाळ्यांत लुप्त होतात असा सूर्य असें दास यांचें म्हणणें आहे (*Rig-Vedic India* I, 517–48).

भाषाशास्त्रदृष्ट्या समाधानकारक, आणि विष्णूचें मूळ स्वरूप निश्चित करण्याच्या कामीं उपकारक असा वाटत नाही. भाषाशास्त्रदृष्ट्या 'शिपिविष्ट' या शब्दाचा विचार केल्यास, त्यांतील 'शिपि' या भागाचा 'शेप' (= पुरुषलिङ्ग) या शब्दाशीं असलेला संबंध डोळ्याआड करतां येत नाही. यूरोभारतीय भाषांतील एतत्सदृश दुसरे शब्द, म्हणजे संस्कृत–शिफा; प्राकृत – छेप; लॅटिन–*cippus, scipio* ( = दण्ड ) वगैरे आहेत. निरुक्तांतहि ( ५·७ ) या शब्दाचा असाच अर्थ सूचित केलेला दिसतो. ( अर्थात्, निरुक्तकारांनी त्या शब्दाचें पुढे जें विवरण केलें आहे तें स्वीकरणीय वाटत नाही ). 'शिपि' या पुरुषलिङ्गवाचक शब्दाला 'विप्' या धातूपासून साधलेलें एक रूप जोडलेलें आहे. त्यावरून 'शिपिविष्ट' या शब्दाचा मूळ अर्थ 'वाढणारें, क्रियाशील, लहानमोठें होणारें पुरुषलिङ्ग' असा कांहीसा असावा असें अनुमान करतां येतें."[४७] विष्णूच्या या स्वरूपाचा उल्लेख वैदिक कवि इतक्या सावधानतेने–guardedly–आणि गूढपणें कां करतात हें आता सहज कळून येण्यासारखें आहे. 'शिपिविष्ट' या विष्णूच्या नांवाबद्दल 'कुत्सितार्थीयं पूर्वं भवति' असें औपमन्यवाने विधान करावें (निरुक्त ५ ७) हेंहि अगदी नैसर्गिक आहे. 'शिपिविष्ट' या शब्दाने विष्णु या देवतेचें प्राचीन लिङ्गसंबद्ध स्वरूप स्पष्टपणें सूचित केलेलें आहे. विष्णूच्या सुलभप्रसूत्वाच्या, प्रभूतफलत्वाच्या (*fertility* ), अवन्ध्यत्वाच्या, सामान्यतः सृजनाच्या कल्पनांशीं प्रथमपासूनच असलेला संबंध 'शिपिविष्ट' या शब्दाने तर सूचित होतोच, पण या संबंधास, वैदिक सूक्तांत आणि यागविधींत विष्णूविषयीं कांहीं प्रासंगिक आणि गौण प्रकारचे उल्लेख आले आहेत, त्यांमुळेंहि पुष्टि मिळते.

वैदिक श्राद्धविधींत एक सामान्यतः दुर्बोध असा भाग आहे पितरांच्या साठीं तयार केलेल्या वर्लींत, नखें साफ काढून आंगठा बुडवावयाचा, व

(४७) पोइम्मनी तर 'शिपिविष्ट' म्हणजे 'लिङ्गस्वरूपाने व्यक्त होणारा' असा त्या शब्दाचा अर्थ केलेला आहे ( *Seljaylns Indien*, 12 ff. ).

असें करीत असतांना विष्णूस आवाहन करावयाचें. या ठिकाणीं अंगुष्ठाला पुरुषलिङ्गाचें प्रतीक समजलें असलें पाहिजे. अशा प्रकारें, वैदिक यागाच्या लिङ्गप्रधान भागाशीं परोक्षतया विष्णूचा संबंध आणलेला आहे[४८]. तैत्तिरीय संहितेंत एका ठिकाणीं (६.२.४.२) 'यज्ञो देवेभ्यः निलायत विष्णुरूपं कृत्वा स पृथिवीं प्राविशत्' असा उल्लेख आलेला आहे, आणि तोहि वर केलेल्या अनुमानास पुष्टिदायक असाच आहे. पृथ्वीमातेच्या गर्भात विष्णूनें प्रवेश करणें हें एखाद्या सुफलताविधीचें — सस्यप्रदताविधीचें — *fertility rite* चें — प्रतीकरूपानें केलेलें वर्णन असावें. विष्णूसंबंधीं ऋग्वेदांत (७९९.१) केलेला 'तन्वा वृधान' हा शब्दप्रयोग त्या देवतेच्या उपर्युल्लिखित मूळ स्वरूपावर चांगलाच प्रकाश पाडतो.[४९] 'हिरण्यगर्भ' आणि 'नारायण' या कल्पनांशीं विष्णूचा संबंध अनेकदा घडवून आणलेला आहे, याचें मर्महि वर दिग्दर्शित केलेल्या दृष्टीनें विचार केला असता सहज लक्षांत येण्यासारखें आहे. अथर्ववेदांत (७.४६.३) सिनीवाली या देवतेशीं विष्णूचा अगदी निकटचा संबंध असल्याचें साक्षात् दर्शविलें आहे. हिलेब्रांट या पंडिताने या संबधाचें गूढ आपल्याला उकलत नाही अशी जवळजवळ स्पष्ट कबुली दिली आहे.[५०] परंतु सिनीवाली या देवतेची स्त्रीलिंगक्रियासंरक्षक देवता म्हणून असलेली प्रसिद्धि आणि वर वर्णिलेलें विष्णूचें मूळ स्वरूप या दोन गोष्टी ध्यानांत घेतल्या म्हणजे या संबधाचें गूढ चटकन् उकलतें. त्याच वेदात, दुसऱ्या एका ठिकाणीं (७ १७.४), विष्णूचा 'प्रजे'शीं असलेला संबंध विशेष प्रकारें सूचित केलेला आहे. तसेंच, शाखायन गृह्यसूत्रात (१.२२.१३) गर्भविधि वर्णिलेला आहे, आणि तेथे

(४८) या संदर्भांत पहा: हेमाद्रि, ३ १३७८ — 'अंगुष्ठमात्रो भगवान् विष्णु पर्यन्ते महीम्'.

(४९) अशाच प्रकारचा ऋ. ८ १००.२ हा उल्लेखहि या संदर्भांत महत्त्वाचा आहे

(५०) HILLEBRANDT. *VM* III, 361.

'विष्णुर्योनिं कल्पयतु' या मंत्राचा (१०·१८४·१) विनियोग सांगितलेला आहे. अशा रीतीने विष्णूचा गर्भाशीं, त्यांचा संरक्षक किंवा त्यांना सुप्रजननक्षम करणारा या नात्याने, संबंध ध्वनित केलेला आहे[५१]. ऋग्वेदांत विष्णूला उद्देशून 'निषिक्तपा' (७·३६·९) आणि 'सुमज्जानि' (१·१५६·२) हे जे शब्द उपयोजिले आहेत त्यांची अन्वर्थकता, वरील विवेचनानंतर, अधिक स्पष्टतेने आपणांस जाणवूं लागते.[५२] तसेंच पोस्य—म्हणजे पुरुषवीर्य—हा शब्दाहि अगदीं अन्वर्थकतेनें विष्णूच्या संबंधीं ऋग्वेदांत (१·१५५·३-४) वापरलेला आहे.

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत 'वृषाकपि' नांवाचें एक सूक्त आहे (१०·८६). त्या सूक्ताच्या अर्थाविषयीं विद्वानांत बराच मतभेद आहे. परंतु त्यासंबंधीच्या वादविवादांत खोलवर शिरणें हें येथे अप्रस्तुत ठरण्यासारखें आहे. त्या सूक्ताचा भावार्थ स्थूलपणें असा सांगतां येईल. एकदा इन्द्र अगदीं दमूनभागून गेलेला होता. त्यावेळीं एका धृष्ट आणि कामप्रवण अशा माकडाने त्याच्यावर कांहीं उपचार केले. आणि त्यामुळे इन्द्राची क्रान्ति आणि ग्लानि नाहींशी होऊन त्यास त्याचें पूर्वीचें वीर्य प्राप्त झालें. ऋग्वेदांतील हा वृषाकपि म्हणजे विष्णुच हें समीकरण, वेदोत्तर वाङ्मयावरून, सिद्ध होण्यासारखें आहे.[५३] विष्णुसहस्रनामांतहि विष्णूच्या

---

(५१) याच्या पुढील मन्त्रांत (१०·१८४·२) सिनीवाली या देवतेचा उल्लेख आला आहे ही गोष्टहि लक्षांत घेण्यासारखी आहे. किंबहुना, हें सर्व सूक्तच विष्णूच्या मूळ स्वरूपावर चांगला प्रकाश पाडतें

(५२) निषिक्तपा = शुक्राचें रक्षण करणारा, सुमज्जानि = सुलभ जन्म घडवून आणणारा (!)

(५३) विष्णूने मत्स्य, कूर्म, वराह वगैरे प्राण्यांची रूपें धारण केली या कल्पनेचा उगम अवन्ध्यत्व - प्रभूतफलत्व — देवता निरनिराळ्या प्राण्यांच्या रूपाने वावरतात या अतिप्राचीन मानवांच्या समजुतींत असणें असंभवनीय नाहीं, असें मत ग्युंर्ट याने प्रदर्शित केलें आहे (उ. प पान ३०८).

अनेक नांवांपैकी एक म्हणून 'वृषाकपि' या नांवाचा समावेश केलेला आहे. अशा प्रकारें सुलभप्रसूत्व, अवन्ध्यत्व, सृजनशीलत्व, इत्यादि कल्पनांशीं विष्णूच्या मूळ स्वरूपाचा अगदीं निकटचा संबंध आहे या विधानास पुष्टिकारक असा पुष्कळच परोक्ष किंवा साक्षात् पुरावा वैदिक वाङ्मयांत आणि यागविधींत सापडूं शकतो. सामान्य जनतेच्या धर्मविषयक विचारप्रणालींत, सुफलत्वाच्या—सृजनशीलत्वाच्या—देवतेस सर्वप्रमुख स्थान दिलें गेलें असलें पाहिजे. विशेषतः, वैदिक आर्यांच्या मानवसमूहांतील, गोपालांच्या आणि कृषीवलांच्या संस्कृतींत—आणि त्यांतूनहि त्या संस्कृतींतील सामान्य जनांत—अशा प्रकारच्या देवतेस आणि तत्संबद्ध यातुप्रधान विधींस किती महत्त्व दिलें गेलें असलें पाहिजे हें सांगावयास नकोच. प्राचीन विष्णूला देखील असेंच अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झालें असलें पाहिजे. अर्थात् वैदिक कवींनी—ते कवि स्वतःस सामान्यतः गोपालकृषीवलांपेक्षा उच्चतर सांस्कृतिक पातळींतील समजत असल्यामुळे—विष्णूचें हें मूळ स्वरूप दडपून टाकलें. आणि, 'अविकृत' वैदिक देवतामण्डलांत विष्णूचा प्रवेश करवून घेणें जेव्हा त्यांना भाग पडलें, तेव्हा त्यांनी विष्णूवर दुसऱ्याच एका रूपाचा—म्हणजे सौरस्वरूपाचा—आरोप केला, व विष्णुविषयक दैवतशास्त्रीय कल्पनेचा त्या दृष्टीने विकास केला.

महाव्रत हा वैदिक विधि निःसंशय एक प्रकारचा अवन्ध्यत्वविधि—fertility rite—आहे. सृजनाशीं किंवा प्रभूतप्रसूत्वाशीं स्पष्टपणें संबद्ध असलेल्या अनेक गोष्टींचा समावेश महाव्रतांत केलेला आहे. योहान्सन या पंडिताने 'महाव्रत' विधीचा विश्लेषणपूर्वक व अत्यंत चिकित्सापूर्ण असा अभ्यास केलेला आहे; आणि त्यावरून त्याने असा एक निष्कर्ष काढलेला आहे की पक्षिरूपांतील एका अवन्ध्यत्वदेवतेचा त्या विधीशीं कांहीं वैशिष्ट्यपूर्ण रीतीने संबंध घडवून आणलेला आहे.[५४] पक्षी हा

(५४) JOHANSSON, *Die altindische Gottin Dhisana*, pp. 46 ff.

अवन्ध्यत्वदेवतेचें प्रतीक आहे हा संकेत अनेक प्राचीन मानवकुलांनी मान्य केला आहे, ही गोष्ट फ्रेझर, मानहार्ट इत्यादि मानवेतिहासशास्त्रज्ञानी सिद्ध केलेलीच आहे.[५५] महाव्रतांत उपयोजिल्या जाणाऱ्या 'महदुक्थ्य' वेदींचा आकार पक्ष्याप्रमाणे असतो ही गोष्टहि अत्यंत सूचक अशीच आहे. 'विष्णु' या शब्दाचा पक्षिवाचक अर्थ; विष्णूचा सृजनशीलत्वाच्या, प्रभूतप्रसूत्वाच्या, कल्पनांशीं असणारा संबंध; आणि मानवेतिहासशास्त्रज्ञांनी सिद्ध केलेला पक्ष्याचा अवन्ध्यत्वादिविषयींशीं असलेला संकेतरूप संबंध – या सर्व गोष्टींचा एकत्र विचार केला कीं विष्णूचें मूळचें व्यक्तिमत्त्व काय असलें पाहिजे हें आपल्याला स्पष्टपणे कळून येतें आणि कोणत्या दृष्टीने विष्णु ही प्रथमपासूनच महत्त्वाची देवता असली पाहिजे हेंहि चटकन् लक्षात येतें.

विष्णूचें मूळचें स्वरूप पक्ष्याचें. आणि या रूपातील विष्णूचा संबंध, इतर प्राचीन लोकांप्रमाणे, प्राचीन वैदिक आर्यांतहि, fertility, productivity इत्यादि, गोपालकृषीवलांना अतिशय महत्त्वाच्या वाटणाऱ्या गोष्टींशीं जोडलेला होता याचमुळे, गोपालकृषीवलांच्या दृष्टीने, विष्णूचें माहात्म्य फार मोठें होतें स्वतःस 'प्रतिष्ठित' समजणाऱ्या वैदिक कवींच्या मनांत मात्र या देवतेसंबंधीं जिव्हाळा किंवा आदरभाव निर्माण झाला नाही. वैदिक आर्यांच्या संस्कृतीच्या ज्या विशिष्ट थरांत वैदिक कवींचें स्थान होतें त्या थराचेंच प्रतिबिंब मुख्यतः ऋग्वेदांत पडलेलें आहे. गोपालकृषीवलांच्या या देवतेचा आणि तत्संबद्ध यातुप्रधान विधींचा गौरव वैदिक कवींनीं केलेला नाही पण त्याबरोबरच, बहुजनसमाजाच्या या देवतेची – विष्णूची – पूर्णपणें उपेक्षा करणेंहि त्यांना शक्य न हतें. 'अधिकृत' किंवा hierarchal वैदिक देवतामण्डलांत विष्णूचा प्रवेश करवून घेणें त्यांना अवश्य वाटलें ऋग्वेदीय देवतामण्डल मुख्यतः

(५५) FRAZER. *The Golden Bough.* MANNHARDT. *Wald-und Feldk*, I.

इन्द्रप्रधान आहे. कुठल्याहि देवतेचें दैवतशास्त्रीय दृष्ट्या उन्नयन करावयाचें असल्यास, त्या देवतेचा — कृत्रिमपणें आणि पल्लवग्राही स्वरूपांत का होईना पण — इन्द्राशीं संबंध जोडणें ही एक त्याची वैदिक पद्धति होती.[९६] वैदिक वाङ्मयांत विष्णूविषयीं हीच भूमिका स्वीकारली गेली आहे. या बाबतींत वैदिक कवींनीं एक गोष्ट मात्र केली. विष्णूचें मूळचें व्यक्तिमत्त्व त्यांनीं 'भूमिगत' केलें. आणि त्याच्याच मूळच्या पक्षिस्वरूपावरून सुचणाऱ्या सूर्यपक्ष्याच्या स्वरूपाचा आरोप त्याच्यावर केला. विष्णु म्हणजे सूर्यदेवता हें समीकरण ऋग्वेदांत प्राधान्यानें निर्माण झालें तें यामुळेच. विष्णूच्या या सौर-स्वरूपाचाच ऋग्वेदांत विकास केलेला आहे. पण इतकें करूनहि, विष्णूचें पक्षिस्वरूप आणि अवन्ध्यत्वादिकल्पनांशीं असलेला त्याचा संबंध हे त्या देवतेच्या मूळच्या व्यक्तिमत्त्वांतील विशेष — अस्पष्ट रीतीनें का होईना पण — वैदिक वाङ्मयांत आणि यागविधींत कायम राहिले.

भारतीय संस्कृतीच्या विकासक्रमांत, वेदोत्तर अशा एका कालखंडांत, गोपालकृषीवलांना धार्मिक विचारक्षेत्रांत मोठीच मान्यता मिळाली हा इतिहास सर्वांना परिचित आहेच. आणि त्यावेळीं मूळ स्वरूपांतील विष्णु गोपालकृष्णाच्या रूपानें पुन्हा अवतरला.

मित्रहो! वैदिक दैवतशास्त्रासंबंधीं माझ्या कांहीं कल्पना मीं आता-पर्यंत आपल्यापुढें मांडल्या आहेत. याविषयीं अधिक विस्तृत पण सूक्ष्म असें संशोधन होणें शक्य आहे, आणि तें अवश्यहि आहे. 'दैवतशास्त्र म्हणजे प्राचीनांची एक प्रकारची संकेतभाषा — प्रतीकभाषा — आहे' असें म्हणतात. प्राचीनांच्या या भाषेचें ज्ञान जितक्या स्पष्टपणें आणि संपूर्णपणें आपणांस होईल तितक्या स्पष्टपणें आणि संपूर्णपणें आपणांस त्यांच्या जीवनाचें आणि संस्कृतीचें ज्ञान प्राप्त होईल. हें ज्ञान उपलब्ध करून

(९६) तसेंच वैदिक यागाच्या दृष्टीनें ज्याचा देवतेचें उन्नयन करावयाचें असल्यास त्या देवतेचा संबंध सामान्यतः सोमाशीं जोडीत असत.

घेण्याचा निष्ठापूर्वक प्रयत्न करणारा मी एक विद्यार्थी आहें. आणि माझ्यासारख्याच इतर विद्यार्थ्यांना माझ्या वाचनाचा आणि मननाचा कांहीं उपयोग झाला तर तें मी आपलें सद्भाग्य समजेन. असें सद्भाग्य मिळविण्याची संधि आणि शक्यता, या व्याख्यानांच्या द्वारा, मला प्राप्त करून दिली याबद्दल मी कौशिक व्याख्यानमालेच्या संचालकांना, आणि, सज्जनहो! तुम्हालाहि, मनःपूर्वक धन्यवाद देतों.

---

# परिशिष्ट

## व्याख्यान चौथें

### 'शिपिविष्ट' विष्णु

ऋ. १.१५५.६ : चतुर्भिः साकं नवतिं च नामभि-
श्चक्रं न वृत्तं व्यतीँरवीविपत् ।

एखाद्या फिरणाऱ्या चक्राप्रमाणे (विष्णूने) प्रत्येकीं चार नांवांच्या नव्वद (घोड्यांना) प्रवर्तित केलें.

ऋ. १.१५५.५ : तृतीयमस्य नकिरा दधर्षति
वयश्चन पतयन्तः पतत्रिणः ।

त्याच्या (विष्णूच्या) तिसऱ्या पावलाजवळ जाण्याची कोणाचीहि हिंमत होत नाहीं – आपल्या (बलवान्) पंखांनीं उडणाऱ्या पक्ष्यांची – सुद्धा नाही.

ऋ. १.१५४.५ : विष्णोः पदे परमे मध्व उत्सः ।

विष्णूच्या अंतिम (तिसऱ्या) पावलाच्या ठिकाणीं मधुरतेचा झरा आहे.

ऋ. ८.२९.७ : त्रीण्येक उरुगायो वि चक्रमे
यत्र देवासो मदन्ति ॥

जेथे देव आनंद उपभोगतात तेथपर्यंत आपल्या तीन पावलांनीं दूर चालणारा एक (= विष्णु) पोचला.

ऋ. १.१५४.५ : तदस्य प्रियमभि पाथो अश्यां
नरो यत्र देवयवो मदन्ति ।

जेथे देवाचे भक्त आनंद उपभोगतात त्या विष्णूच्या प्रिय स्थानाप्रत (परमपदाप्रत) मी जाऊं इच्छितों.

ऋ १.१५४.६ : ता वां वास्तून्युश्मसि गमध्यै
यत्र गावो भूरिशृङ्गा अयासः ।

जेथे अनेकशृंगयुक्त चपळ गाई (= तेजःकिरणें किंवा तारे?) आहेत अशा तुम्हां दोघांच्या वसतीप्रत आम्ही जाऊं इच्छितों.

ऋ ५.३.३ : पदं यद् विष्णोरुपमं निधायि
तेन पासि गुह्यं नाम गोनाम् ।

जें विष्णूचें सर्वोच्च पद म्हणून स्थापिलें गेलें त्याने (= तेथे) तूं गाईंच्या गुह्याचें रक्षण करतोस.

ऋ. १.१५४.२ : यस्योरुषु त्रिषु विक्रमणे–
ष्वधिक्षियन्ति भुवनानि विश्वा ।

ज्याच्या तीन विस्तृत पदन्यासांत अखिल विश्वाचा अन्तर्भाव होतो.

ऋ १.२२.१६ : अतो देवा अवन्तु नो यतो विष्णुर्विचक्रमे ।
पृथिव्याः सप्त धामभि- ॥

जेथून विष्णूने पृथ्वीच्या सातहि विभागातून आक्रमण करण्यासाठी आपल्या पदन्यासाचा प्रारंभ केला तेथूनच (= पृथ्वीवरूनच) देव आमचें पालन करावयास लागोत

ऋ ७.१००.६ . किमित्ते विष्णो परिचक्ष्यं भूत्
प्र यद्ववक्षे शिपिविष्टो अस्मि ।
मा वर्पो अस्मदप गूह एतद्

*हे विष्णो, जेव्हा 'मी शिपिविष्ट आहें' असें तू जाहीर केलेंस तेव्ह* तुझ्या ठिकाणीं दूषणीय असें काय होतें? आपलें तें रूप आमच्या पासून लपवू नकोस– तें रूप गुप्त ठेवू नकोस कारण युद्धाच्या वेळीं तु दुसरें रूप घेतले होतेंसच

ऋ. १०.१८४ १ • विष्णुर्योनिं कल्पयतु त्वष्टा रूपाणिं पिंशतु ।
आ सिंञ्चतु प्रजापतिर्धाता गर्भं दधातु ते ॥

विष्णु तुझी कूस सुव्यवस्थित ठेवो त्वष्टा तुझ्या गर्भाचें स्वरूप आणि आकार यांची घडण करो प्रजापति वीर्यसिंचन करो धाता संपूर्ण गर्भाचें योग्य व्यवस्थापन करो

# वैदिक देवतांचें अभिनवदर्शन

